

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका










विनोदप्रधान वर्षारंभ विशेषांक

वर्ष २५ वे

मार्च १९६९

मूल्य २ रु.

# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य-कला-विलास

## श्रेयनामावली

गोमंतवीर मोहन रानडे यांचा 'त्रिवार जयजयकार'— **बा. भ. बोरकर** ● परशुरामाची सावली काका बर्वे नि काकू यांना असह्य ठरली — **रवींद्र पिंगे** ● जॅकेलीन, हे तू कसं केलंस? ...सोज्वळ मनाची प्रामाणिक व्यथा— **पु. भा. भावे** ● बाटल्याची कढई ... सर, पण पुढल्या नाटकांत मला काम देणार ना? — **वा. रा. सोनार** ● वासू हरला, वासू जिंकला ... जिकडे पहावं तिकडे वैताग आणणारा वासू नि वालू — **ग. का. भडकमकर** ● आम्ही पाहिलेली 'सुलोचना'—एक आगळे व्यक्तीदर्शन — **सुधीर दामले**

याशिवाय

### ❋ आणखी काही पदव्या ❋

● मासिक व्यंगचित्रमाला ●

● विनोदी कविता ● पानपुरी ● इंद्रधनुष्य ● दीपमाला ● रंगमंच ● ऐसी अक्षरे रसिके ही नेहेमींची खुसखुशीत सदरे

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक : श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत २ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही. चित्रे व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन. Registered with the Registrar of Newspapers for India under RNNo. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay-4.







**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन ★ तारेचा पत्ता

३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. १६

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# रजत-महोत्सवाच्या उंबरठ्यावर--

या अंकापासून 'दीपावली' आपल्या पंचविसाव्या म्हणजेच रजत-महोत्सवी वर्षात पदार्पण करीत आहे, हे नमूद करताना आम्हाला अत्यंत आनंद आणि अभिमान वाटत आहे. सुख-दुःखाचे उन्हाळे-पावसाळे अनुभवीत 'दीपावली'ने हा पल्ला गाठला आहे. मानवाच्या जीवनात पंचविशीला जे महत्त्व आहे त्यापेक्षाही अधिक महत्त्व साहित्य-जीवन जगणाऱ्या नियतकालिकांना आहे हे म्हणणे या क्षेत्रात वावरणाऱ्या अनुभवी लोकांना सहज पटेल. गेल्या चोवीस वर्षात 'दीपावली' केवळ वयाने वाढली नाही, तर अगदी पहिल्या अंकापासून मनी धरलेल्या ध्येयांच्या दिशेने तिने वाटचाल केली आहे याची साक्ष चोखंदळ वाचकच देतील.

चालू वर्ष हे 'दीपावली'चे रौप्य-महोत्सवी वर्ष असल्याने या वर्षात 'दीपावली'च्या विविध पैलूंचे मूल्यमापन करण्याचे योजले आहे. त्यानुसार 'परिसंवाद', 'दीर्घकथा व कादंबऱ्या', 'प्रवासवर्णने, लेखमाला व मुलाखती', 'दीपावलीचे विविध विषयांवरील विशेषांक', 'सांस्कृतिक साहित्य', 'चित्रकला आणि व्यंगचित्रे', 'विनोदी साहित्य', इत्यादि विषयांवर त्या त्या विषयातील मुरब्बी साहित्यिकांकडून मूल्यमापन करणारे खास लेख चालू वर्षात प्रसिद्ध करण्यात येणार आहेत. या लेखांवरून 'दीपावली'ने आपल्या पहिल्या अंकापासूनच निरनिराळ्या विषयांमध्ये कसकशी आणि किती प्रगती केली आहे याचे सम्यग् दर्शन वाचकांना होणार आहे. त्या दृष्टीने हे सर्व लेख अतिशय महत्त्वाचे ठरणार आहेत यावद्दल वेगळी ग्वाही देण्याची आवश्यकताच नाही.

या रजत-महोत्सवी वर्षात 'दीपावली'चे दरवर्षीपेक्षा काही जादा विशेषांक प्रसिद्ध होणार आहेत. हा अंक 'वर्षारंभ विनोद-प्रधान विशेषांक' म्हणून प्रसिद्ध होत आहे. 'दीपावली'ने 'भारतीय नौदल दर्शन' आणि 'भारतीय सेना' हे विशेषांक यापूर्वीच प्रसिद्ध केले आहेत. भारतीय संरक्षण सामर्थ्याचा तिसरा विभाग म्हणजे 'वायुसेना दल!' त्या विभागाची सर्वांगीण माहिती 'वायुसेना-दल विशेषांक' (मे) प्रसिद्ध करून देण्यात येणार आहे. 'संगीत विशेषांक' हे तर गेली तीन वर्षे 'दीपावली'चे खास वैशिष्ट्यच होऊन राहिले आहे. यंदाही जून[illegible] अंक हा 'चौथा संगीत विशेषांक' म्हणून प्रसिद्ध होत आहे. कथा-विशेषांक (जुलै) मीप्रम[illegible]च उत्तमोत्तम कथांनिशी प्रसिद्ध होईल. [illegible] वर्ष हे महात्मा गांधींच्या जन्मशताब्दीचे असल्याने ऑग[illegible] अंक 'गांधी जन्मशताब्दी विशेषांक' म्हणून प्रसिद्ध करून 'दीपावली' या थोर पुढाऱ्याला आदरांजली वाहणार आहे. नंतरचा खास अंक म्हणजे 'दिवाळी' अंक होय! दिवाळी अंकामध्ये 'दीपावली'ने विशिष्ट स्थान प्राप्त करून घेतले आहे ते वाचकांना माहीतच आहे. शिवाय या वर्षाचा 'दिवाळी अंक' हा 'दीपावली'चा 'रौप्यमहोत्सवी विशेषांक' होय! तेव्हा 'दीपावली'ने प्राप्त केलेल्या स्थानाला आणि रौप्य-महोत्सवी विशेषांकाला साजेसा उत्कृष्ट आणि दर्जेदार साहित्याने दिवाळी अंक नटलेला असेल, यापेक्षा त्याविषयी अधिक सांगण्याची जरुरी नाही. डिसेंबरात 'क्रिकेट-पुरवणी' हा तर 'दीपावली'च्या बाबतीत नित्याचा नेम झालेला आहे. १९७० च्या फेब्रुवारीचा अंक हा गणराज्य दिन विशेषांक म्हणून प्रसिद्ध करून 'दीपावली' आपले रौप्य-महोत्सवी वर्ष पूर्ण करील.

'दीपावली'च्या रजत-महोत्सवात 'दीपावली'च्या लेखकांना आणि वाचकांनाही सहभागी करून घेण्यात येत आहे. या वर्षभरात कथा, कविता, एकांकिका, ललित लेख, विनोदी साहित्य, कादंबरीका प्रसिद्ध होतील. वाचकांच्या मताने त्यातील उत्कृष्ट ठरणाऱ्या प्रत्येक विभागातील लेखकाला 'दीपावली'तर्फे 'रौप्य-पदक' देण्यात येणार आहे. वाचकांचे मत अजमावण्यासाठी प्रत्येक अंकातून 'कूपन' प्रसिद्ध करण्यात येत आहे त्याकडे वाचकांचे लक्ष वेधू इच्छितो. उत्कृष्ट साहित्याची निवड करण्यात जे वाचक यशस्वी ठरतील त्यांनाही खास पारितोषिके देण्यात येणार आहेत. या योजनेत आपले सर्व सहकार्य देऊन आमचा वाचक व लेखकवर्ग आमचा आनंद शतगुणित करील असा आम्हाला विश्वास वाटतो.

**- संपादक**



# आम्ही पाहिलेली सुलोचना

ग. दि. माडगूळकर बलराज सहानी भाई भोसले व सौ. भोसले
राजा ठाकूर विनायकराव सरस्वते अनंत धुमाळ डॉ. काशिनाथ घाणेकर
प्रभृतींनी घडविलेले आगळे व्यक्तीदर्शन

एखाद्या व्यक्तीने आपल्या व्यावसायिक जीवनात पंचवीस वर्षे पूर्ण करणे ही आज असामान्य गोष्ट आहे असे मुळीच नाही. अनेक-जण अनेक क्षेत्रात पंचवीसच काय त्याहूनही जास्त वर्षे घालवितात. पण त्या प्रत्येकाचा गौरव करायचा तर ते एक संकटच ठरेल कारण त्यांनी त्या त्या क्षेत्रात जगण्यापलिकडे फारसे काही केलेलेच नसते. म्हणूनच ज्यांनी काही विशेष कमाई केलेली असते त्यांचा गौरव उचित तर असतोच पण मार्गदर्शक ठरावा अशा योग्यतेचा असतो. चित्रव्यवसायात सुलोचना या अभिनेत्रीने घालविलेली पंचवीस वर्षे ही अशा योग्यतेची आहेत. सतत पंचवीस वर्षे यश, यश आणि यश या पलिकडे त्यांनी काही पाहिलेलेच नाही. असे असूनही यशाची धुंदी किंवा मस्ती त्यांना चढलेली नाही, हा मोठा विशेष ! अशी ही सर्वांना हवीहवीशी वाटणारी, सर्वांची आवडती सुलोचना आज मराठी चित्रसृष्टीप्रमाणे हिंदीतही मानाचे, आदराचे स्थान प्राप्त करून राहिली आहे.

सुलोचनाबाईंच्या अंगी असलेल्या उपजत दर्जेदार अभिनय-गुणांविषयी नव्याने सांगावे असे काय आहे ? गेली पंचवीस वर्षे हिंदी मराठी चित्ररसिक त्याचा अनुभव घेतच आहेत. पडद्यावर आपल्या अभिनयनैपुण्याने सर्वांना आपलीशी करणारी ही सुलोचना एरव्हीच्या जीवनात कशी वागते, तिच्या निष्ठा काय आहेत, वृत्ती कशी आहे, परिचितात, व्यावसायिकात तिच्याबद्दल मत तरी काय आहे याचा कानोसा घेऊन त्या आधारे तिच्या व्यक्तिमत्त्वाचे एक आगळे दर्शन घडविण्याचा प्रयत्न करता आल्यास पहावा असा विचार मनात आल्याने त्यांच्याशी या ना त्या नात्याने संबंध असणाऱ्या काही व्यक्तींना भेटलो. त्यांचे विचार ऐकले तेच पुढे ठेवले आहेत. थोडक्यात सांगायचे तर भेटलेल्या या प्रत्येकाने सुलोचना एक श्रेष्ठ दर्जाची अभिनेत्री आहे हे तर मान्य केलेच पण एरव्हीच्या जीवनातही ती एक 'महान स्त्री' हा आपला अभिप्राय एकमुखाने व्यक्त केला.

संकलक : सुधीर दामले





अनुक्रमणिका

**सुलोचना, दिग्द. ठाकूर व श्री. ग. दि. माडगूळकर**



## भजुन मनाची होते ओंजळ

सुप्रसिद्ध पटकथाकार, गीतकार श्री. ग. दि. तथा अण्णासाहेब माडगूळकर यांच्या असंख्य चित्रकथांतील व्यक्तिरेखा सुलोचनाबाईंनी पडद्यावर साकार केलेल्या आहेत. पण एक पटकथाकार आणि अभिनेत्री एवढेच त्यांच्यामध्ये संबंध नाहीत. सुलोचनाबाईंच्याच शब्दात सांगायचे तर अण्णा त्यांना वंदनीय आहेत. चित्रसृष्टीत दोघा व्यक्तींवर त्यांची अपार श्रद्धा आहे, निष्ठा आहे. त्यातले एक श्री. भालजी पेंढारकर आणि दुसरे श्री. ग. दि. माडगूळकर! सुलोचनाबाईंना आदरणीय असणाऱ्या माडगूळकरांना तिच्याबद्दल काय वाटते हे सांगताना ते म्हणाले, "मी चित्रसृष्टीत या ना त्या नात्याने माझी आजवरची सारी हयात घालविली पण माझ्या घरात तुम्ही प्रवेश केलात तर हा माणूस सिनेमाधंद्यातला आहे असे सांगूनही पटणार नाही. इतके पावित्र्य मी राखले आहे, माझ्या पत्नीने मेंटेन केले आहे. घरात तसबीर आढळलीच तर देवादिकांची, नाहीतर आदरणीय व्यक्तींची सांपडेल. सिनेनटीचे चित्र नावालाही आढळणार नाही. असे असूनही सुलोचनेला मात्र केव्हाही अन् कधीही अगदी चुलीपर्यंत प्रवेश आहे. याचे कारण अग दीस्पष्ट आहे: मला किंवा माझ्या पत्नीला ती सिनेमातली नटी कधी वाटलीच नाही. विशेष म्हणजे गेल्या बीस-बावीस वर्षात तिने आपल्या वागणुकीने माझ्या पत्नीच्या भावनांना तिळमात्रही धक्का लावलेला नाही. दोघीही एकमेकींच्या जिव्हाळयाच्या मैत्रिणी किंवा तसं कशाला सुलोचना आमच्या कुटुंबियांपैकीच एक असं मी मानतो, माझी पत्नी मानते. अगदी अलिकडचंच उदाहरण घ्या, तिच्या भाचीचं लग्न झालं, ही बाई एखाद्या नात्यातल्या माणसाकडे अक्षत घेऊन जावे अशा आगत्याने मला बोलावणं करायला आली. सुलोचनेवर खानदानी संस्कार आहेत असं मी म्हणतो ते अशा गोष्टींमुळे! माझ्या मुलाच्या मुंजीत, अंग मोडून काम करायला ती अगदी घरच्यासारखी राबली ती केवळ आम्हांविषयी तिला वाटणाऱ्या प्रेमामुळेच! माझ्या मुलाच्या मुंजीत तिनं एक आग्रह धरला होता. "संध्याकाळी बटू देवाला जाईल तो तिच्या गाडीतून गेला पाहिजे!" गोष्ट अगदी साधी, पण त्यामागील तिच्या सद्भावनांचं मोल मला करता येणं केवळ अशक्य!

सिनेमाधंद्यात इतकी वर्षे राहिली पण बाईनं कधी फॅशन केल्याचं मी तरी पाहिलेलं नाही. तिच्या चेहऱ्यावरची सुस्तता सोज्वळता तिच्या कपडयांच्या बाबतीतही दिसते. छानछोकीपणा तर तिने कधी केलेला नाहीच पण कधी पैशाचा किंवा दागिन्यांचा हव्यास केल्याचं मी पाहिलं नाही. आलिशान बंगल्यात किंवा ब्लॉकमध्ये रहाण्याऐवजी वाड्यात रहाणं तिला अधिक आवडतं. तिच्या गांवी तिने शेती केली आहे, मोठी छान केली आहे. तिला कसली आवड असेल तर ती शेतीची! तिच्या बैलांना शर्यतीत नंबर मिळाला तर तिला केवढा आनंद होतो.

तिच्या या खानदानी वृत्ती आजच्या नाहीत. ती चित्रसृष्टीत आली तेव्हापासून मी पहात आहे. पूर्वी चित्रपटातले सारे लोक एका कुटुंबाप्रमाणे वागत असत. रोज सहभोजनाचा कार्यक्रम ठरलेलाच असे. यावेळी ही बाई आपणहून एक काम स्वीकारायची, ते म्हणजे सर्वांचे डबे एकत्र करून आग्रह करून प्रत्येकाला जेवायला वाढायचे!

तिला सर्वांबद्दलच आपलेपणा आणि जिव्हाळा वाटतो. तो व्यक्त करण्याची तिची तऱ्हाही मोठी नाजुक. उत्तानपणा, भडकपणा त्यात नावालाही आढळणार नाही. १७।१८ वर्षांपूर्वीचा माझा एक अनुभव आजही ताजा आहे. कुठल्याशा एका स्टुडिओत चित्रिकरण चालू होते. बाई मेकअपरूममध्ये मेकअप करीत होती. मी स्टुडिओतून लांब अंतरावर असलेल्या ऑफिसमध्ये चाललो होतो. झिमझिम पाऊस पडत होता. छत्री जवळ नसल्याने मी तसाच भिजत चाललो होतो. ते बाईनं खिडकीतून पाहिलं. मेकअप तसा अर्धवट टाकला आणि छत्री घेऊन पळत माझ्याजवळ आली आणि माझ्या डोक्यावर छत्री धरून ऑफिसपर्यंत मला सोबत केली. एक शब्दही बोलली नाही. सुलोचनेचा आपलेपणा, अगत्य हे असे आहे निष्पाप, अन् अबोल! आम्ही काही साहित्यिक लडाखला गेलो होतो. विमानतळावर आम्हा सर्वांना हार घालण्यासाठी बाई हजर!

चित्रसृष्टीत असूनही तिचे वाचन आज इतके आहे की कुणीही मध्यमवर्गीय गृहिणी वाचणार नाही इतके वाचन ती करते. जेव्हा एखाद्या गोष्टीचा चित्रपटासाठी उपयोग होईल असे तिला वाटते तेव्हा तसे निर्मात्याला, दिग्दर्शकाला सांगायला चुकत नाही. आपण अशिक्षित आहोत ही जाणीव तिला सदैव आहे पण वाचन वाढवून तिने त्यावर मात केली आहे.

आदरणीय व्यक्तींच्या शब्दाला मान देण्याची तिची वृत्ती तर अनन्यसाधारणच आहे. 'सौभाग्य' चित्राची गोष्ट! निर्मात्याच्या इच्छेवरून अगदी एका छोटया कामाकरता मी तिच्याजवळ शब्द टाकला. कसलेही आढेवेढे न घेता ती काम करून गेली देखील! वास्तविक त्यावेळी ती ऐन प्रसिद्धीच्या शिखरावर पोहचलेली, पण माझा शब्द मोडला नाही.

आज सुलोचनेला एवढा मानसन्मान मिळाला तरी पूर्वीची तिची विद्यार्थीवृत्ती कायम आहे. याचे मला मोठं नवल वाटतं. तिच्या अभ्यासूवृत्तीचा, जिद्दीचा पडताळा मला 'पारिजातक' चित्रपटाचे वेळीच आला. सत्यभामेच्या कामासाठी मी तिची निवड केली. ही निवड इतर कुणालाही पसंत नव्हती. कारण सत्यभामा संस्कृतप्रचुर बोलणारी आणि सुलोचना तोवर ग्रामीण भूमिकाच

अनुक्रमणिका

करीत असल्याने तिची भाषा तेव्हा अत्यंत अशुद्ध होती. पण मला विश्वास होता, सुलोचना त्या कामात तिळमात्रही कमी पडणार नाही. त्यापूर्वी तिने सीतास्वयंवरमध्ये पृथ्वीमातेची भूमिका केली होती. त्यावेळी ती इतकी सुन्दर दिसली होती की, मी तेव्हापासून ठरविले होते तिला पौराणिक भूमिका द्यायच्या. त्यासाठी ती पूर्णपणे योग्य ठरेल–फक्त भाषेची अडचण, पण तिची जिद्द मला माहीत होती. माझा आग्रह कुणालाच मोडवेना. अखेर सत्यभामा म्हणून तिची निवड झाली. तालमी सुरू झाल्या. तिला एक वाक्य होते, "सारिके, सारिके, घे तो परशू आणि तोड तो वृक्ष !" बाईने अशा भयानक रीतीने, अशुद्ध उच्चारात ते वाक्य उच्चारले की अंगावर काटा उभा राहिला. पण बाईची हिंमत मोठी, तिने अतोनात परिश्रम केले आणि थोड्याच दिवसात वाणीवर प्रभुत्व मिळविले. अभ्यासूवृत्ती हवी ती ही अशी! आज तिचे ते पूर्वीचे उच्चार आठवले की मी पोट धरून हसू लागतो. मी आणि तिने चित्रपटात एकत्र काम करावे अशी तिची फार दिवसांपासूनची इच्छा आहे पण अजून तो योग आला नाही.

माडगूळकरांनी सुलोचनाबाईंच्या गुणांचे वर्णन शब्दात केले पण माडगूळकर हे एक सिद्धहस्त कवि देखील आहेत. सुलोचना-बाईंच्या सौंदर्याकडे ते कवि म्हणून जेव्हा पहातात तेव्हा काही वर्षांपूर्वी स्फुरलेल्या ओळी त्याना आठवल्या, त्यात त्यांचे कविमन म्हणते,

"कृष्ण लोचने तुला पाहता अजुन मनाची होते ओंजळ ।
तृप्त अयाचित नयनामध्ये अजुनी मंचरे काही चंचल ॥"

## मिलीयन डॉलर स्माईल

सुलोचनाबाईंनी मराठीइतकेच हिंदी चित्रसृष्टीतही मानाचे स्थान मिळविले आहे. त्यांच्या अभिनयगुणांविषयी सर्वांना आदर आहेच पण व्यक्ती म्हणूनही त्या मोठ्या कशा आहेत हे हिंदी चित्र-सृष्टीतील एक चरित्र अभिनेते बलराज सहानी यांच्या उद्‌गारावरून स्पष्ट होईल. बलराज सहानीना सुलोचनाबाईंच्या अभिनयसाम-र्थ्याची प्रथम ओळख झाली ती त्यांनी त्यांचा "स्त्री जन्मा ही तुझी कहाणी" हा चित्रपट पाहिला तेव्हा. त्याबद्दल बोलताना ते म्हणाले, त्यात त्यांनी केलेली अक्काची भूमिका पाहून मी अक्षरशः भारावून गेलो होतो. त्यांचे अलौकिक अभिनयसामर्थ्य पाहून वाटलं या बाई-बरोबर कधी तरी काम करायला पाहिजे. तो योग 'जवाहर' या चित्राचे वेळी प्रथम आला. त्यात मी दारूड्या माणसाचे काम करीत होतो. माझ्या पत्नीची भूमिका त्यांच्याकडे आली होती. मुहूर्ताच्या दिवशी सेट लावला होता लग्नाच्या पहिल्या रात्रीचा ! हा नवरा गुत्त्यावरून चिकार दारू पिऊन घरी येतो. तिथे असताना त्याच्या मित्रांनी त्याला बायकोला मुठीत ठेवण्याचा सल्ला दिलेला असतो. या माणसाची कल्पना अशी की पहिल्या भेटीतच बायकोला सडकून मारले म्हणजे ती मुठीत राहील. म्हणून त्या मीलनाच्या रात्रीच तो बायकोला जोड्याने बदडतो असा सीन चित्रित केला गेला. ज्या सुलोचनाबाईंच्या अभिनय सामर्थ्याने मी दिपून गेलो होतो, ज्यांच्याविषयी मला आदर निर्माण झाला होता त्यांनाच पहिल्याच कामाचे वेळी, जोड्याने मारावे लागावे याचे मला विलक्षण दुःख झाले पण करणार काय? योग विचित्र होता येवढे खरे, सुदैवाने तो चित्रपट नंतर पूर्ण झाला नाही हा भाग वेगळा. पण जेव्हा त्यांच्या-बरोबरच्या त्या पहिल्या शूटिंगची मला आठवण होते तेव्हा आजही मी शर्मिंदा होतो. त्यानंतर आम्ही दोघांनी अनेक चित्रांतून एकत्र कामे केली. या प्रत्येक वेळी माझा त्यांच्या विषयीचा आदर, स्नेह दुणावतच गेला आहे. त्यांना निसर्गाने जे शांत, सोज्वळ सौंदर्य बहाल केले आहे ते अनन्यसाधारण तर आहेच पण त्या जोडीला त्यांची अभिनयाची समज, त्यांच्या चेहऱ्यावर झपाट्याने बदलणारे, आणि अचूक व्यक्त होणारे भाव, ते व्यक्त करण्यातील त्यांची सहजता, आवाजातील झार, सारे कसे दिपून टाकणारे! बाईंचे डोळे, ते सुन्दर तर आहेतच पण त्यापेक्षाही त्यांचे हसणे अप्रतिम आहे. मी त्याला 'मिलीयन डॉलर स्माईल' म्हणेन. असं हसणे मराठी चित्रसृष्टीत तर कुणाकडे नाहीच, पण हिंदीतही नाही. या त्यांच्या हसण्याबद्दल माझी आपली एक तक्रार आहे. ती म्हणजे त्या आपल्या हसण्याचा नीटसा वापर करीत नाहीत. हसताना त्या नेहमी कॉन्शस होतात. असे निदान माझे तरी मत आहे.



सुलोचना आणि बलराज साहनी

त्यांच्या अभिनयाइतकेच त्यांचे एरव्हीचे वागणेही दर्जेदार आहे. चित्रपटसृष्टीत सहसा न आढळणारा साधेपणा त्यांच्यात आहे. पण त्याहूनही महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांना त्यांच्या महाराष्ट्रीय संस्कृतीचा फार अभिमान आहे. मी स्वतः माझ्या पंजाबी संस्कृतीचा अभिमानी असल्याने सुलोचनाबाईंचे हे वागणे मला फार महत्त्वाचे वाटते. आज चित्रसृष्टीतील आम्ही लोक आम्हाला न शोभणाऱ्या पाश्चात्य संस्कृतीचे बेगडी अनुकरण करतो, पण सुलोचनाबाई त्याच्या कधी वाटेलाही गेलेल्या नाहीत. त्यांची आपल्या संस्कृतीवर पूर्ण श्रद्धा आहे. आम्हा दोघातील ह्या संस्कृतीबद्दलच्या अभिमानामुळे आमच्या मैत्रीत एक आगळाच जिव्हाळा निर्माण झालेला आहे.

★ ★



## त्रिवार जयजयकार

[गोमंतवीर मोहन रानडे यांची पोर्तुगीज तुरुंगातून मुक्तता झाल्यानंतर ते फेब्रुवारीच्या प्रारंभी प्रथम गोव्यात आले तेव्हा गोमंतकीय जनतेने त्यांचा वीरोचित भव्य सत्कार केला. सुप्रसिद्ध कविवर्य बा. भ. बोरकर यांनीही त्यांचा 'त्रिवार जयजयकार' केला तो 'दीपावली'च्या वाचकांसाठी मुद्दाम येथे उद्धृत केला आहे. —संपादक]

उज्ज्वल अमुच्या ध्येयांचा तूं मृत्युंजय ॐकार
सात लाख कंठातुन तुज हा त्रिवार जयजयकार
दिशांपरी आशाहि उजळल्या तुझ्या दर्शनाने
उन्हांत न्हाली संग्रामाची सोन्याचीं पानें
क्रांतिध्वज अस्माना भिडला सहर्ष अभिमाने
लाटे लाटेमधून सिंधुच्या कृतार्थ जयगाने
स्वातंत्र्याचा टिळा तळपतो आईच्या भाळी
संतोषाच्या आणि अश्रुंची लोचनात जाळी
ढोल नगारे तिचे गर्जती आज तुझा बडिवार
सात लाख कंठातुन तुज हा त्रिवार जयजयकार
स्वातंत्र्याला असे न सीमा, क्रांतीला विश्राम
कंकण त्यांचें जयें बांधलें त्या न धाम आराम
एक संपलें पर्व दुजें परि आहे त्याहुनी घोर
त्यास्तव आम्हा हवा वीर जो पुनश्च कापिल दोर
सामान्यांची तळी उचलुनी उभवील त्यांची मान
प्राणा घालुनि हांक तयांचें अभंग राखील त्राण
आणि कोंडिच्या कोंडाण्याचें फोडिल पुढचें दार
सात लाख कंठातुन तुज हा त्रिवार जयजयकार
अजुन व्हायची आहे सुजला सुफला ही भूमी
बांधायाची असे एकता प्रखर राष्ट्रधर्मी
प्रगटाया प्रत्येक प्राक्तनी पुरुषार्थाचा सर्ग
इथेंच आहे उभवायाचा मनुष्यतेचा स्वर्ग
कोटिकरांनीं समूर्त करूनी राष्ट्रपित्याचे ध्यास
असे द्यायचें सुखशांतीचे अभंग स्वप्न जगास
म्हणूनि शोधितों तुझ्यांत वीरा पुन्हां धीर आधार
सात लाख कंठातुन तुज हा त्रिवार जयजयकार

३-२-६९ — बा. भ. बोरकर

### चेक फाडून टाकला

श्री. राजा ठाकूर हे मराठी चित्रसृष्टीतले एक अभ्यासू, कुशल दिग्दर्शक. त्यांच्या कामावरील निष्ठेमुळे राजाभाऊंवर सुलोचनाबाईंचा भारी लोभ, आणि राजाभाऊ त्यांच्या अभिनयगुणावर जितके खूष आहेत तितकेच त्यांच्या दिलदार वृत्तीवरही ! "माझं घर माझी माणसं" हे चित्र राजाभाऊंनी अक्षरशः कफल्लक अवस्थेत फार मोठ्या आशा-आकांक्षा उमेद बाळगून सुरू केले. कारण चित्र वेगळ्या धर्तीचं, सुलोचनाबाईंचा रोलही एकदम निराळ्या पद्धतीचा होता. (आजही ती डॉ. इरावतीची भूमिका सुलोचनाबाईंच्या मते सर्वश्रेष्ठ आहे) चित्राचे शूटिंग जवळ जवळ संपत आले होते, तोवर राजाभाऊंनी बाईंना एक पैदेखील दिली नव्हती. पण अचानक एक दिवस शूटिंग सुरू होण्यापूर्वी सुलोचनाबाईंकडून राजाभाऊंना पैशाची मागणी आली. 'पैसे मिळाले तरच काम करीन' असा निरोप होता. राजाभाऊ अत्यंत गांगरून गेले. असा निरोप सुलोचनाबाईंकडून येईल ही स्वप्नातसुद्धा खरी न वाटणारी गोष्ट ! पण काही लोकांनी सुलोचनाबाईंवर दडपण आणून त्यांच्या मनाविरुद्ध त्यांना तसा निरोप पाठवायला लावला होता. पैशाची काहीही सोय होत नाही असा उलट निरोप राजाभाऊंनी धाडला. काही वेळाने दुसरा निरोप आला त्यात एक तोड सुचविली होती. ती म्हणजे चित्र प्रकाशित झाल्यानंतर एक महिन्यानंतरच्या तारखेचा चेक तरी राजाभाऊंनी द्यावा. चित्र चालणार ही अपेक्षा असल्याने राजाभाऊंनी ते कबूल केले. चेक दिला, शूटिंग झाले. चित्र प्रकाशितही झाले. आणि साफ आपटले. पैसा गोळा झाला नाही. चेक दिल्याची तारीख जवळ आली. राजाभाऊ अस्वस्थ झाले. अखेर बेअब्रू व्हायला नको म्हणून त्यांनी एका माणसाबरोबर सुलोचनाबाईंना निरोप धाडला "कृपा करून चेक भरू नका, माझ्याकडे पैसे नाहीत !" निरोप ऐकून बाईंनी काय केले असेल ? बाईंनी त्या माणसाबरोबर सेफमधून तो चेक बाहेर काढून फाडून टाकला. आणि राजाभाऊंना कळविले, "तुम्ही मुळीच वाईट वाटून घेऊ नका, तुमच्या कामावर, प्रामाणिकपणावर मी फार खूष आहे. मला माझे पैसे केव्हाच पावले आहेत. उलट पूर्वी माझ्या हातून घडलेल्या वर्तनाबद्दल मला माफ करा. सारे विसरून जा ! !"

मराठी चित्रसृष्टीत काही चांगलं घडावं, चांगले विषय पडद्यावर यावेत याचीही त्यांना भारी तळमळ. मला त्या नेहमी म्हणतात, "तुमच्याकडून आम्हा कलाकारांच्या, प्रेक्षकांच्या फार मोठ्या अपेक्षा आहेत तुम्ही चित्रपटांचा दर्जा वाढविला पाहिजे !" त्या नुसतं बोलून रहाणार नाहीत तर जरूर ते मार्गदर्शनही करतात, मदत करतात. 'एकटी'च्याच वेळचा ताजा अनुभव ! निर्माते गुलाम हुसेन यांनी मला आधी दुसरीच गोष्ट सुचविली होती. मला ती तितकीशी पसंत नव्हती पण या निर्मात्याचा आणि माझा प्रथमच परिचय झाला होता. त्यामुळे भिडस्तपणामुळे आणि काम मिळाल्याने योग्य पैसाही मिळेल या आशेने मी चित्रपटाच्या दिग्दर्शनास रुकार दिला. फक्त बाईंना माझी नाराजी बोलून दाखविली. त्यावर त्या म्हणाल्या, "अहो, मग तसे स्पष्ट गुलाम हुसेनना सांगा, तुमची सूचना स्वीकारण्या-









अनुक्रमणिका

इतके त्यांचे मन निश्चित मोठे आहे. तुम्ही तुमचे विचार तर स्पष्ट-पणाने मांडून पहा, आणि तसे केल्याने तुमचे काम जाईल असे वाटत असेल नो तर ते जाणार नाही याची मी हमी देते !" बाईंनी इतके ठामपणाने सांगितल्यावर काय पाहिजे. मी निर्मात्याला माझे स्पष्ट मत दिले; त्यांनाही ते पटले आणि मग 'एकटी'ची निर्मिती झाली. मी काही उल्लेखनीय कामगिरी तरी करू शकलो.

## नर्गिसची ओटी भरली

हिंदी चित्रव्यावसायिकातील सुलोचनाबाईंचा एक निस्सीम चाहता म्हणजे सुनील दत्त. बाईंच्या वागण्यावर, अभिनयावर ते एकदम खूष आहेत. ते म्हणतात, "सुलोचनाबाईंनी आपल्या दर्जेदार अभिनयाने, प्रेमळ, आपुलकीच्या वागणुकीमुळे हिंदी चित्रसृष्टीतील आपले स्थान गेली अनेक वर्षे कायम टिकवून धरले आहे. आणि पुढेही ते तसेच रहाणार यात मला तरी कसलीही शंका नाही. 'सुजाता' चित्राचे वेळी त्यांची माझी प्रथम ओळख झाली. तेव्हापासून आज-तागायत ती दृढच होत राहिली आहे. अलिकडेच त्यांच्या भाचीच्या लग्नाला आम्ही दोघे गेलो होतो तिथे त्यांनी नर्गिसची महाराष्ट्रीय पद्धतीप्रमाणे ओटी भरली. माझ्या डोळ्यात आनंदाने, अभिमानाने आसवे उभी राहिली. तो प्रसंग तर माझ्या हृदयात कायमचा कोरला गेला आहे."

## एक्स्ट्रॉ म्हणून प्रारंभ

विनोदी अभिनेते धुमाळ यांना एखाद्या मराठी माणसाने हिंदी चित्रसृष्टीत येऊन नाव मिळवावं या गोष्टीचा मोठा आनंद होतो व अभिमानही वाटतो. या कारणासाठी त्यांना सुलोचनाबाईंचा अभि-मान आहेच. ते म्हणतात, "आम्ही दोघांनीही चित्रसृष्टीत एक्स्ट्रॉ म्हणूनच आयुष्याला सुरुवात केली. योगायोग असा की दोघांचाही पहिला क्लोजअप एकाच चित्रात झाला आहे. 'महारथी कर्ण' चित्र-पटात सुलोचनाबाई झाल्या होत्या दासी अन् मी झालो होतो राज-पुरोहित! पण तेव्हाचे दोघेही एक्स्ट्रॉ कलाकार आज हिंदी मराठी चित्रसृष्टीत मोठ्या मानाने जगतो आहोत, ही मोठी मौजेची गोष्ट आहे.

"आम्हा दोघांना एकमेकांबद्दल आदर तर आहेच पण पर-स्परांच्या शब्दाला किंमत द्यायची वृत्तीदेखील आहे. आज त्यांनी मी एखाद्या निर्मात्याकडे जाऊन काम करावे असे सांगितले तर पैशाचा किंवा इतर कसलाही विचार न करता मी काम करीन आणि हीच गोष्ट त्यांच्याही बाबतीत घडेल असा मला विश्वास आहे. 'भिंतीला कान असतात' या चित्रात केवळ त्यांनी मला सांगितलं म्हणूनच मी काम केले आहे, एरव्ही मी काम करणार नव्हतो. १९४२ किंवा ४३ साली मी त्यांना प्रथम पाहिले. त्यावेळी त्यांची शरीरयष्टी म्हणजे हाडांचा सापळा होता पण त्यांचे ते तेजस्वी, बोलके डोळे आणि लांबसडक काळेभोर केस या गोष्टी म्हणजे त्यांचे सौंदर्य.

## राजेंद्रकुमारच्या तोंडात भडकावल्या

मराठी चित्रसृष्टीचे एक तळमळीचे कार्यकर्ते आणि चित्रनिर्माते श्री. विनायकराव सरस्वते हे सुलोचनाबाईंच्या गुणांवर लुब्ध झालेल्यां-पैकीच एक! सुलोचनाबाईंच्या भूमिका असणाऱ्या चित्राचे निर्माते म्हणून बोलताना श्री. सरस्वते म्हणाले, "मराठी निर्माता मग तो कसाही असो, त्याला सहकार्य देण्याच्या त्यांच्या वृत्तीला तोड नाही. आम्हा मराठी निर्मात्यांच्या असंख्य चुका पोटात घालायच्या असा त्यांनी जणू पण केला आहे असे वाटते. आणि ती गोष्ट त्या निष्ठेने पाळीतही आलेल्या आहेत. माझ्या 'गोराकुंभार' या चित्राचे शूटिंग कोल्हापूरला चालू होते तेव्हाचा एकच प्रसंग सांगतो. बाई रेल्वेनी येणार होत्या. त्यांना स्टेशनवरून आणायला मी गाडी पाठवायला हवी होती. पण कामाच्या गडबडीत साफ विसरलो. बाईंनी स्टेशनवर उतरताच गाडी दिसत नाही असे पाहून सरळ रिक्षा करून स्टुडि-ओत आल्या. त्यांना पहाताच मी त्यांची माफी मागितली. त्या म्हणाल्या, "अहो, माफी कसली मागता? गडबडीत माणूस विसरतो. आणि मी रिक्षानी आले म्हणून बिघडलं काय?" त्याच दिवशी कुणी एक ज्युनिअर आर्टिस्ट एस.टी.ने येणार होता. तो एस. टी. स्टँडवर गाडीची वाट पहात दोन तास थांबून राहिला अखेर फोन करून मला धमकीही दिली की गाडी पाठविलीत तरच येईन म्हणून !"



सुनील दत्त आणि सुलोचना

मराठी चित्रसृष्टीत सुलोचनाबाई आज आणखीही एक मह-त्वाचं काम करतात ते म्हणजे मध्यस्थी करणे आणि भांडणं मिटविणे! अनेक वेळा निर्माते, दिग्दर्शक, कलाकार यात मतभेद होतात. कित्येक



सुलोचना आणि विनोदी नट धुमाळ









अनुक्रमणिका



डॉ. काशिनाथ घाणेकर, श्री. भालजी पेंढारकर व सुलोचना

वेळा ते विकोपालाही जातात अशा वेळी सुलोचनाबाई जर त्या चित्रात असतील तर भांडण कधी मिटतं ते कुणाला कळतदेखील नाही. त्यांच्याजवळ काय जादू आहे न कळे पण हे सारे प्रकरण त्या अशा सफाईने हाताळतात की थंडावलेले काम अधिक जोमाने सुरू होते.

त्यांच्या "आई मिलनकी वेला" या चित्राच्या सेटवरची एक आठवण मला आजही स्मरते. ह्या चित्रात त्या राजेंद्रकुमारच्या आईचं काम करीत होत्या. राजेंद्रकुमारच्या वर्तनाबद्दल आईला अनेक वाईट गोष्टी ऐकायला मिळतात. आपल्या इभ्रतीला डाग लागला या दुःखाने ही आई संतापून उठते आणि मुलाच्या थडाथड मुस्कटात मारू लागते असा प्रसंग! सुलोचनाबाई या प्रसंगाशी इतक्या समरस झाल्या होत्या की राजेंद्रकुमारला त्यांनी फार जोरात मुस्कटात मारल्या. साहजिकच सेटवरचे सारे वातावरण कमालीचे स्तब्ध झाले. सीन संपला आणि बाई भानावर आल्या. पण त्या सेटवर क्षणभरही थांबल्या नाहीत. चटकन् खोलीत गेल्या आणि खुर्चीत कुठेतरी एकटक पहात राहिल्या. बाई सेट सोडून कां गेल्या हे पहायला खुद्द राजेंद्रकुमार आणि दिग्दर्शक त्यांच्या खोलीत गेले. राजेंद्रकुमारला पहाताच बाई हमसाहमशी रडू लागल्या. त्यांच्या गालावरून हात फिरवीत म्हणाल्या, "खरंच मी फार मारलं हो तुम्हाला? फार लागलं असेल नाही. मला माफ करा, पण खरं सांगू मी स्वतःला विसरलेच होते!" राजेंद्रकुमारचे मनही मोठे, तो उत्तरला, "अहो मुलाच्या चुकीबद्दल आईने त्याला मारलेच पाहिजे! आणि असं सांगा आईचा मार मुलाला कधी लागतो का?"

बाईंचा स्वभाव अभिमानीही आहे. स्वतःबद्दल तर हा अभिमान आहेच, पण आपल्या दुसऱ्या कलाकारांचाही त्यांना अभिमान आहे. कुणाही कलाकाराचा अपमान होता कामा नये, ज्याला त्याला त्याच्या हक्काचे मिळालेच पाहिजे यावर त्यांचा भारी कटाक्ष! सहाव्या महाराष्ट्र राज्य चित्रपट महोत्सवात त्यांना गोराकुंभार या चित्रात साहाय्यक अभिनेत्री म्हणून पारितोषिक मिळाले होते त्या पारितोषिकाचा त्यांनी साफ इन्कार केला. कारण एकच, त्यांची संतूमाईची भूमिका सहाय्यक भूमिका मुळी नव्हतीच. ते त्यांनी घेतल्याने दुसऱ्या साहाय्यक अभिनेत्रीचा मान चुकणार होता. बाईंनी पारितोषिकाचा इन्कार केल्याने सरकारला आपली चूक कळून आली. आणि त्यांनी खास बाब म्हणून प्रमुख अभिनेत्रीचे एक पारितोपिक बाईंना देऊ केले. बाईंनी एका खास समारंभात उत्कृष्ट अभिनेत्री म्हणूनच ते स्वीकारले.

## कलाकाराची कदर

सुलोचनाबाईंना आपली आई मानणाऱ्या चित्र-नाट्य सृष्टीतील लोकप्रिय कलाकार डॉ. काशिनाथ घाणेकरांना बाई म्हणजे प्रतीदेवता वाटतात. ते म्हणाले, "त्यांचा माझा प्रथम परिचय झाला तो 'रायगडाला जेव्हा जाग येते'मध्ये मी काम करीत होतो तेव्हा! पंचविसाव्या प्रयोगाला त्या आल्या होत्या. आत येऊन त्यांनी माझे आवर्जून कौतुक केले होते. एवढ्या मोठ्या अभिनेत्रीने मुद्दाम आत येऊन माझे अभिनंदन करावे याचे तर मला अप्रूप वाटले. सुलोचनाबाईंचे अभिनंदन तेवढ्यावरच थांबले नाही तर त्यानंतर जो भेटेल त्याच्या जवळ त्या माझी स्तुती करीत राहिल्या. एका कलाकाराने दुसऱ्या कलाकाराची अशी स्तुती करावी हे मी माझ्या आयुष्यात प्रथमच पहात होतो. पुढे परिचय वाढला तेव्हा त्यांच्या निकट परिचितांप्रमाणे दिदी म्हणू लागलो आणि आज त्यांची मुलगी कांचन त्यांना ज्या लाडक्या नावाने हाक मारते त्या 'आत्ती' या नावाने पुकारतो. यातच त्यांच्या माझ्यात निर्माण झालेल्या नात्याची कल्पना येईल.

"माझ्या आत्तीने चित्रसृष्टीवर फार मोठे उपकार केले आहेत असे मला नेहमी वाटते. हे उपकार म्हणजे त्यांनी चित्रसृष्टीला आणून दिलेला दर्जा. आम्हा सिनेमावाल्यांकडे समाज हेटाळणीने पहातो. पण आत्तीच्या वागणुकीमुळे समाजातही तिला मानाचं स्थान मिळतांना पाहून धन्यता वाटते. आज त्यांच्या घरात मी माझी पत्नी इरावती दोघांनाही अगदी घरच्यासारखे मानतात. त्यांच्या मायेचा आम्हा दोघांवर सतत वर्षाव होत असतो."

## गाजावाजा न करता मदत

सुलोचनाबाईंच्या स्वभावातील एक फार मोठे वैशिष्ट्य म्हणजे त्यांनी आपल्या गोड, परोपकारी, लाघवी स्वभावामुळे असंख्य माणसे जोडली आहेत. त्यांना फारसे नातेवाईक नाहीत पण आज त्यांनी नुसता निरोप पाठवायचा अवकाश शंभर माणूस त्यांच्या मदतीला उभा राहील. ही कमाई काही सामान्य नाही. सुलोचनाबाईंच्या अशा असंख्य आप्तांमधील, जणू आज त्यांच्या घरातलेच एक असे श्री. भाई भोसले आणि त्यांच्या पत्नी सौ. कमलाबाई भोसले यांनी सुलोचनाबाईंना अत्यंत जवळून पाहिलेले आहे. श्री. भोसले म्हणतात, "आज वैभवाचा, कीर्तीचा लाभ होऊनही सुलोचनाबाईंना अहंकाराची जरादेखील ओळख नाही. सुलोचनाबाईंचे दोन फार मोठे गुण म्हणजे त्यांची जाज्वल्य निष्ठा आणि दिलदार, उदार स्वभाव!

आजवर त्यांनी अनेकांना इतकं काही दिलं आहे की त्याची गणतीच होणार नाही. वरं, या देण्यातही बडेजाव नाही, प्रसिद्धीचा हावरेपणा नाही. जे काही करायचं ते गुपचूप! बऱ्याच वेळा त्या

(पृष्ठ ५५ वर पहा)







# जॅकेलीन
# हें तूं कसं केलंस ?

—पु. भा. भावे



....लोकांच्या दृष्टीने केनेडी हे एक सुंदर स्वप्न होते, भीषण शोकान्तामुळे अधिकच भेदक बनलेली ती एक परीकथा होती. जॉन हा त्या परिकथेतला राजपुत्र होता .... पण . . . पण . . . शेवटी जॅकी कमी पडली . . .

जॅकेलीन बुव्हिये (Bouvie) केनेडीने असे केले तरी काय ? तिने लग्न केले. पुनर्लग्न केले. लग्न, पुनर्लग्न व घटस्फोट ह्यां गोष्ठी गोऱ्या अमेरिकी समाजात फारशा नवलपरीच्या नाहीत. प्रत्यक्ष जॅकेलीनच्या आईनेच मुळी जॅकेलीनच्या बापाला काडी मोडून दिली. जॉन बुव्हियेला तिने रामराम ठोकला, तेव्हा जॅकेलीन केवळ अकरा वर्षांची होती. जॅकेलीनला आपल्या वडिलांविषयी फार कौतुक होते. (आईला नव्हते हे उघडच आहे) जॅकेलीनच्या आईने नवे लग्न केले. तिचे सावत्र बाबा आणि सख्ख्या मातोश्री, तिचे हे पुनर्लग्न पहायला ईश्वरकृपेन जीवित आहेत.

जॅकेलीनच्या ह्या लग्नाने बऱ्याच गोष्टी पचविणाऱ्या गोऱ्या समाजाला सुद्धा धक्का दिला. कडव्या कॅथॉलिक चर्चची धांदल उडाली. ओनॅसिस घटस्फोटित आहे. (आणखीही बऱ्याच गोष्टी आहेत.) तो जुन्या ग्रीक चर्चचा. जॅकेलीन ही पिढीजात कॅथॉलिक. कॅथॉलिक चर्चला हे लग्न मान्य नाही. त्यांच्या कर्मठ सोवळ्या-ओवळ्यात हे पाखंडी लग्न बसत नाही. पण रोमच्या ह्या पाद्र्यांना विचारतो कोण ? जॅकेलीन-ऑरिसचे ठरलेले होते. कुणालाही न जुमानता त्यांनी हे लग्न करून टाकले. जगभर ह्या लग्नाचा धक्का बसला. काहीतरी फार चुकले, असे साऱ्यांना वाटले. अमेरिकेला तर मेल्याहून मेल्यासारखे झाले. हुतात्मा झालेल्या त्यांच्या देवगंधर्वतुल्य अध्यक्षाची देखणी विधवा एका म्हातारड्या श्रीमंताने पळविली होती. "पर्ल हार्बर"च्या तोडीचाच हा धक्का त्यांना वाटला. हा म्हातारडा पुन्हा अमेरिकन सुद्धा नव्हता. तो होता स्वर्गात जन्मलेला ग्रीक ! नंतर अर्जेंटिनात येऊन श्रीमंत झालेला. एखाद्या वीराची विधवा एखाद्या जिरेमिरे विकणाऱ्या वाण्याला वश व्हावी, तसा तो प्रकार लोकांना वाटला. बरे, तो म्हातारासुद्धा तसा सरळ नव्हता. त्याने अनेक लफडी भानगडी केलेल्या होत्या.गेली दहा वर्षे दिवा मारिया कलास (Diva Maria Callas) नावाच्या एका प्रसिद्ध गाणारणीशी











अनुक्रमणिका

त्याचे 'लफडे चालू होते. ह्या मारिया कलासलाही त्याने तिच्या इटालियन नवऱ्यापासून फूस लावूनच आणले होते. चाळीशीपर्यंत ह्या बुवाने लग्नच केले नाही, मग लग्न केले ते सतरा वर्षांच्या एका कोवळ्या पोरीशी! (कोवळ्या वायका ह्या जांवुवंताला तेव्हापासून धार्जिण्या होत्या.) तिचे नाव अथिना ("टिना") लिव्हॅनॉस! (Athina Livanos) तीही श्रीमंत वापाची लेक होती.

स्टॅव्हरॉस लिव्हॅनॉस हा देखील एक मोठा व्यापारी नौकापती होता. नेमके त्याच्याच मुलीला ॲरि ओनॅसिसने हेरले. तिच्यापासून त्याला दोन मुलेही झाली. पुढे तिने त्याला घस्फोट दिला. मारिया कलास प्रकरणामुळे दिला, असे म्हणतात. आणि तिने स्वतः पुनर्लग्न केले. ती मार्श आनेस ब्लॅण्डफोर्ड बनली. तिच्यापासून झालेली सतरा व वीसची मुलगा-मुलगी ओनॅसिस बाबाच्या दुसऱ्या लग्नाला उपस्थित होती. टिनाने ओनॅसिसला "मानसिक छळवादा"चे (Mental Cruelty) कारण दाखवून घटस्फोट मिळविला. हे सारे जॅकेलीनला ठाऊक असलेच पाहिजे. तरीही तिने "न्यूयॉर्कपासून स्कॉर्पिऑस" बेटापर्यंत धाव मारून ओनॅसिसशी लग्न केले. ओनॅसिसशी "ऑलिम्पिक एअर लाईन" तिच्या सेवेला हजर होती. जॅक केनेडीपासून झालेल्या जॉन व कॅरोलिन ह्या दोन लहानग्या मुलानीही आपल्या पूज्य मातोश्रींच्या दुसऱ्या लग्नाचा सोहळा पाहिला. आपल्या नणंदा (श्रीमती स्मिथ क्लाफोर्ड), वहिणी व मेहुणा यांनाही जॅकेलिनने लग्नासाठी नेले होते. तिच्या आईने तिला सावत्र वाप दिला. जॅकेलिनने आपल्या मुलांना सावत्र वाप दिला. अंतर इतकेच की जॅकीच्या आईने घटस्फोट घेतला, जॅकीने तो घेतला नव्हता. (परंतु ह्या विषम लग्नानंतर ही संधीदेखील तिला उपलब्ध होऊ शकेल.) एकंदरीत अगदी निःसंकोचपणे जॅकीने हा पाट लावला. संकोचली ती अन्य मंडळी आणि संकोचाची ही तार जगभर आली.

"ह्याच्यात हिने पाहिले काय?" हा ठराविक प्रश्न सर्वत्र विचारला जाऊ लागला. ह्या प्रश्नाचे उत्तर देणार कोण? कदाचित जॅकीलाही ह्या प्रश्नाचे स्वच्छ व स्पष्ट उत्तर देता येणार नाही. कदाचित तिलाच ते इच्छा असली तर देता येईल. ओनॅसिसचे नाव मोठे! म्हणजे शब्दशः मोठे! ॲरिस्टॉटल सॉक्रेटिस ओनॅसिस हे त्याचे नाव! म्हणजे दोन मोठ्या माणसांना हा ओनॅसिस आधीच खाऊन बसला आहे. (जॉन केनेडी हा तिसरा!) सॉक्रेटिस व ॲरिस्टॉटल ह्या दोन महान तत्त्वज्ञांच्या शालजोडीला हे "ओनॅसिस"चे गावठी ठिगळ चिकटून वसले आहे. अन्य नाव ओनॅसिसपाशी नव्हते. जॉन केनेडी कीर्तीमंत होता (सुंदर आणि कर्तृत्वावानही होताच) जॉनमुळे जॅकेलिन प्रसिद्ध होती. ह्या दोघांची नावे जगभर प्रसिद्ध होती. अगदी हिंदुस्थानातल्या खेड्या-पाड्यातूनही त्यांची चित्रे प्रेमाने लावून ठेवलेली सापडतात. ओनॅसिसला अगदी परवापर्यंत ओळखत होते कोण? त्याच्यापाशी अमाप पैसा असेल, पण फार तर तो त्याच्या मर्यादित वर्तुळात ठाऊक होता. त्याला जगभर प्रसिद्धी मिळाली जॉन केनेडीच्या विधवेशी लग्न करणारा म्हणून! आणि ही प्रसिद्धी मोठीशी स्पृहणीय नव्हती. वाकडे तोंड करूनच माणसे ओनॅसिसचे नाव घेतात. एक पवित्र स्मृती भ्रष्ट करणारा, एका सुंदर कल्पना-चित्रावर डाग पाडणारा, उठवळ, उपटसुंभ, उडाणटप्पू हीच अनेकांची ओनॅसिसविषयीची भावना आहे. पण जॅकेलिनने तर त्याला जॅक कॅनडीची जागा दिली. तिने तर त्याची शय्यासोबत निवडली. कां?

ॲरी ओनॅसिस हा वयाने तब्बल वासष्ट वर्षांचा (वासष्टचा की सदुष्टचा हा पुन्हा वादाचा विषय आहेच. कारण एका दस्तऐवजावरील जन्म दिनांकाप्रमाणे त्याचे वय सदुसष्ट ठरते. ठरते! ओनॅसिस ऋषि म्हणतात की काही एक काम साधण्यासाठी तेव्हा मला खोटा जन्मदिवस द्यावा लागला. एकूण काम साधले म्हणजे झाले. खरे खोटे नंतर पाहू!) जॅकेलिन केनेडी एकोणचाळीसची. म्हणजे ॲरी बाबा तिच्यापेक्षा तेवीस वर्षांनी मोठा! तिचा आजा नव्हे, तरी वाप शोभेल अशा वयाचा पहिली टिना हीदेखील वयाने ॲरी महाराजांची लेक शोभेल अशीच होती. दोघांच्या वयातले अंतर सरासरी असेच पाव शतकाचे, अशी विषम लग्ने करू नये असे जाणते म्हणतात. कारण ती दुःखास कारणीभूत होण्याचा संभवच अधिक! आमच्या जुन्या सुधारकांनी हा कंठशोष सनातनी हिंदू समाजाच्या कानाशी फार वर्षे केला. पण आता ह्या पुढारलेल्या अमेरिकी "लेडी"-समोर ते तरी काय बोलणार! तिने तर सारे तरणेताठे कडेस सारून एका वासष्ट वर्षाच्या वृद्धाशी शादी केली. तेव्हा तिची कर्तव्य म्हणून कड घेणे काही पुरोगाम्यांच्या कर्मात आले. समर्थन व्यक्तीस्वातंत्र्याचे व इच्छा स्वातंत्र्याचे! जॅकेलिन काही लहान किंवा अडाणी पोर नव्हती. तिने स्वेच्छेनेच हे लग्न केले. पण म्हणूनच ते अधिक दूषणीय ठरण्यासारखे होते. साखर उपलब्ध असता स्वेच्छेने माती खाणाऱ्यांस कोण काय म्हणणार? तसे म्हटले तर हत्या. चोऱ्या, बलात्कार हेदेखील स्वेच्छेनेच होत असतात. व्यक्तीस्वातंत्र्याचे संरक्षण ह्या अपराधांना देता येईल काय? विषम विवाह हा जर निंद्य असेल, तर रूपसुंदर जॅकीने तो केला, म्हणून तो वंद्य ठरण्यासारखा नाही.



'मारिया कलास' ओनॅसिसची एक प्रिया









अनुक्रमणिका

(स्तालिनला तर स्वेतलानाचा ज्यू परिणयही खपला नाही. त्याने जावयाचा काटा काढला. अमेरिकेत हे होणार नाही.) पण वधुवरात वयाचे फार मोठे अंतर असणे, हे अनेक आपत्तींना आमंत्रण देण्यासारखे आहे, हे जॅकेलिनलाही ठाऊक असेल. तरी तिने हे हास्यास्पद लग्न केले. (स्तालिन असता तर तो तिला रडविता. पण मग ओनॅसिसवावा या फंदातच पडतेना.) ह्या लग्नात हास्यास्पद भाग तसा पुष्कळच आहे. हिंदुस्थानी माणसाना तर तो फारच हास्यास्पद व उद्वेगजनक वाटण्यासारखा आहे. हे महाशय सांस्कृतिक उंचीने तर छोटेखानी आहेतच, पण शारीरिक उंचीनेही जॅकीपेक्षा इंचभराने कमी आहेत. राजबिंड्या जॉन केनेडीचे छायाचित्र पाहून



जॅकेलिन लॉर्ड हार्लेक समवेत कंबोडियामध्ये.

मग ह्या म्हातारबोवांचा मुद्रित मुखडा पाहिला की, "हे चित्र पहा आणि ते चित्र पहा!" असेच उद्गार माणसाच्या तोंडून निघतात. (हे उद्गार जॅकेलिनची पहिली मुले मोठी झाल्यावर काढतीलही. तिची दहा वर्षांची मुलगी कॅरोलिना ही तर ह्या लग्नामुळे आजच उदास (Depressed) झाल्याचे सांगतात. ओनॅसिस हा स्पर्नातल्या एका तंबाकूच्या व्यापाऱ्याचा मुलगा! तुर्कांच्या जाचामुळे हा तेथून अर्जेन्टिनात पळाला. तंबाकूचा व्यापार ह्यानेही केला. पुढे हा नौकापती बनला. तेलाची ने-आण करू लागला. तरुण वयातच तो लक्षाधीश व पुढे कोटयधीश बनला. पैसा ह्याने अमाप मिळविला. म्हणजे एका अर्थाने सगळेच मिळविले. तरी माणसे त्याच्या सांस्कृतिक पातळीविषयी काय-कसे करतात. कुणी म्हणतात "तो सद्‌गृहस्थ नाही" कुणी म्हणतात "त्याची जागा बंदराच्या धक्क्यावर आहे, सुसंस्कृत माणसांच्या बैठकीत तो शोभण्यासारखा नाही." कुणी म्हणतात "तो अगदी गांवढळ माणूस आहे. खरे म्हणजे एखाद्या रासवट शेतकऱ्याच्या जातीचा (Peasant) तो आहे. त्याच्यापाशी बऱ्यापैकी विनोदबुद्धीसुद्धा नाही. टिनाच्या पत्र्यावर हाडाच्या दोन सांगड्यानी प्रेमाचे प्रयोग सुरू केले तर केवढा भयंकर ध्वनी होईल हे रंगवून सांगणे, ही त्याची विनोद बुद्धी!"

पण एवढी विनोद बुद्धीसुद्धा बाहुलीसारख्या जॅकेलिन केनेडीला पुरली. हा गांवढळ रासवटच सारी सुसंस्कृत माणसे झिडकारून तिने निवडला. कदाचित् त्याचा रासवटपणा, गांवढळपणा व त्याची अगदी खालच्या प्रतीची एखाद्या खलाशाला शोभेल अशी विनोद बुद्धीच तिला आवडली असेल. शेवटी माणूस हे एक कोडे आहे. स्त्री हे अधिक मोठे कोडे आहे आणि म्हणूनच सामान्य माणसे बुचकळ्यात पडली. त्यांना वाटले, ह्या जॅकेलिन केनेडीने हे केले तरी काय? तिने हे कसे केले? नागवे नाच आनंदाने पहाणाऱ्या ब्रिटिशांच्या तोंडून देखील " Jakie, how could you ?" (जॅकी, हे तू कसं करू शकलीस!) असाच आश्चर्योद्‌गार बाहेर पडला. नग्न नृत्यापेक्षादेखील हे कृत्य त्यांना अधिक धक्का देणारे वाटले. आणि जगभर माणसाना असेच वाटले. जॅकीच्या पुर्नविवाहाची वार्ता ऐकल्यावर आपल्याच नात्यातल्या कुणा स्त्रीचे पाऊल चुकले, आपल्याच अंगावर शितोडा उडाला असे अनेकांना वाटले. आणि ह्याचे कारण जॅकेलिन केनेडी हे एक प्रतीक होते. तो एक आदर्श होता. ते एक उदास, पण पवित्र आणि सुंदर मानले गेलेले कल्पनाचित्र होते. ते चित्र केवळ अमेरिकेचेच नव्हते, तर साऱ्या मनुष्य जातीचे होते. जॅकेलिनवर माणसांनी काही सनातन आदर्शांचा व मूल्यांचा आरोप केला होता. त्या आदर्शांचे व मूल्यांचे त्यांनी तिला प्रतीक मानले होते. जॅकेलिन केनेडी ही कुणी सामान्य स्त्री नव्हती. संभवतः ती सामान्य असली तरी लग्नसंबंधाने तिला असामान्यता दिली होती. ती अमेरिकेतल्या सर्वात उच्चपदस्थ पुरुषाची—जॉन केनेडीची बायको होती. अमेरिकन राष्ट्राने जॉनसमवेतच तिचाही सन्मान केला होता. तिच्यावरही प्रेमाचा आणि कौतुकाचा वर्षाव केला होता. जॉनच्या जिवंतपणी तर केलाच होता, पण जॉनच्या मृत्यूनंतरही केला होता. अधिक मोठ्या कळवळयाने केला होता. जॉनसमवेत तिने सारी सुखे भोगली. राष्ट्राकडून सन्मान घेतले. ते सारे सन्मान तेव्हा तिला गोड वाटले. तेव्हा त्या राष्ट्राला अपमानकारक वाटेल, असे काही न करणे हे तिचे कर्तव्य होते. ती हुतात्मा जॉनची धर्मपत्नी होती. त्याच्या नावाला कमीपणा येईल असे काही न करणे हेही तिचे कर्तव्य होते. येथे व्यक्ती-स्वातंत्र्याचा काही प्रश्न नव्हता. मोठ्या माणसांच्या स्वातंत्र्याला व वैयक्तिक आवडी-निवडीना त्यांच्या मोठेपणाच्याच मर्यादा असतात. त्या त्यांना पाळाव्याच लागतात. त्या त्यांनी पाळल्याच पाहिजेत. जॅकेलिन केनेडी अमेरिकेच्या अध्यक्षाची पत्नी बनली, तेव्हाच तिचे "संपूर्ण" स्वातंत्र्य संपले. ती एखादी सामान्य स्त्री उरली नाही. सामान्यांना शरीरसंरक्षक कुठे मिळतात? तिला एक असामान्य स्थान मिळाले व त्या स्थानाचे असामान्य दायित्वही तिच्यावर आले. साऱ्या अमेरिकन राष्ट्राची व अमेरिकन स्त्रीजातीची ती प्रतिनिधी बनली. त्यांच्या गौरवाची व आदर्शांचीही प्रतिनिधी बनणे तिला प्राप्त होते. रामाची सीता व्हायचे, तर वनवासाची व वल्कलांची

सिद्धता ठेवावीच लागते. थोरल्या माधवरावांची रमाबाई व्हायचे तर जळून जायला सिद्ध असावेच लागते. झांशीची राणी लक्ष्मीचे वैभव भोगायचे तर प्रसंगी जीवावर उदार व्हावेच लागते. मी रमा, लक्ष्मी किंवा अहिल्याबाई होळकर होईन, परंतु मला पुनर्विवाहाची मोकळीक असावी, असे कुणाला म्हणता यावयाचे नाही आणि जी म्हणेल, ती सीता, रमा, किंवा लक्ष्मी नव्हेच ! वैयक्तिक सुखे, आणि सार्वजनिक कर्तव्य, हे द्वंद्व जुने आहे. ह्या द्वंद्वात प्रामाणिक नेत्यांना वैयक्तिक सुखाचा विचार नेहमीच सोडावा लागतो. मोठ्या माणसांना मोठेपणाचे मूल्य द्यावेच लागते. स्वातंत्र्यवीर सावरकरांना तो विचार सोडावा लागतो एवढेच नव्हे तर सौ. माई सावरकरांनाही तो विचार सोडावा लागतो.

पण जॅकेलिनने हा विचार सोडला. गोऱ्या नीती-कल्पना तशा पुष्कळच सैल असतानासुद्धा जॅकेलिनने आपणाला कमीपणा आणला. तिने भयंकर अविचार केला, असे गोऱ्या अमेरिकेला वाटले, देवी अहिल्याबाई होळकरांसारख्या एखाद्या व्रतस्थ विधवेशी जॅकेलिनची तुलना करण्याचे कारण नाही. ब्रिटिश राजदूत लॉर्ड हार्लेक ( Harlech ), माईक निकोल्स, मायकेल फॉरेस्टाल, शिल्पकार जॉन कार्ल वॉरनेक (Warnecke), लेखक-संपादक जॉर्ज फिलम्पटन (George Plimphton) पॉल माथिआस, अशा जॅकीच्या कमी-अधिक सहवासात येऊन गेलेल्या पुरुषांची नामावली प्रसिद्ध झालेली आहे. पैकी लॉर्ड हार्लेक समवेत तर ती कंबोडियातले अंगकोरवत मंदिर पाहून आली.

जॅकेलिनचे पुनर्लग्न अमेरिकेने तसे चालवून घेतले असते. पन्नास वर्षाच्या लॉर्ड हालकशी ती लग्न करील अशी अनेकांची अपेक्षा होती. प्रख्यात मार्लबरो घराण्याचा हा वारसदार अमेरिकेला चालला असता. पण जॅकीला तो चालला नाही. समोरून टक्कल पडत आलेल्या एखाद्या बँक मॅनेजर किंवा प्राध्यापकासारख्या दिसणाऱ्या ह्या दमट प्रकृतीच्या, संथ अंग्रेजाशी विवाहबद्ध होऊन त्याच्या वेल्समधल्या जुनाट, ओलसर वाड्यात जाऊन राहण्याची कल्पना तिला आकर्षक वाटली नाही. तिने निवडला तो उलटे केस फिरविणारा ओनॅसिस !

ओनॅसिसला जॅकेलिनने कां निवडले ? तो वयाने तिच्या बाप शोभेल असा, रूपाने जांबुवंत, त्याची कीर्ती उंडगेपणाची, आणि संस्कृती अनेक बंदरात डोकावणाऱ्या खलाशाची ! मग त्याच्यापाशी होते काय, की ज्याची ह्या तरण्याताठ्या, देखण्या विधवेला भूल पडावी ? आणि ती भूलदेखील तिला यश पुत्रासारख्या जॉनशी कित्येक वर्षे संसार केल्यावर पडावी ! अमृत चाखल्यावर "सोडा वॉटर"चा मोह पडण्यासारखेच हे नव्हते का ? पण असे झाले खरे, कां झाले ?

कुणी म्हणतात पैसा. पण जॅकी ही स्वतः काही पोळपाट लाटण्याची धनी होण्याच्या बेतात असलेली दरिद्री विधवा नव्हती. ती चांगली श्रीमान होती. सासर, माहेर, दोहोंकडून संपन्न होती. अमेरिका तिला कृतज्ञपणे वार्षिक मानद्रव्यही देत असे. पण असे म्हणतात की जॅकेलिनच्या सवयी फार फार खर्चिक होत्या. तिच्या मोठ्या ऐपतीलाही त्या झेपणाऱ्या नव्हत्या. म्हणून तिने हा अब्जाधीश गाठला. असेच असेल, तर हा सौदा मनाला उबग आणणारा आहे. कुणी म्हणतात, पैसा हेच या लग्नाचे कारण नव्हे, जॅकीला एक "बाप" हवा होता. आईच्या घटस्फोटामुळे अर्ध्या पोरक्या झालेल्या जॅकेलिनला बापाचे प्रेम पाहिजे होते. वैवाहिक जीवन विस्कळीत व अस्थिर झाल्यामुळे ही भूक अनेक अमेरिकन तरुणांना लागत असते. ही भूक न भागल्यामुळेच सधन अमेरिकेतल्या संपन्न घराण्यातली मुलेही बिघडतात, अपराधी बनतात, दुःखी व बेफाम होतात ! प्रख्यात खलनायक एडवर्ड जी. रॉबीन्सन व त्याची



## शापित गंधर्वाला स्मृत्यंजलि

श्री. गोपाळकृष्ण भोबे गेल्याला वर्ष झाले. कै. भोबे हे उत्तम चित्रकार होते, संगीतादि विविध कलांचे शोकीन होते चित्र काढण्यात ज्या सहजतेने त्यांचा कुंचला चाले तितक्याच सहजतेने ते आपली कथाही रंगवीत. संगीत हा तर त्यांचा आत्माच होता. संगीताचे मार्मिक टीकाकार म्हणून त्यांनी संगीत क्षेत्रात अभूतपूर्व कीर्ती मिळविली होती. कै. भोबे यांची स्मृती त्यांच्या मनःपटलावरून कधीच पुसली जाणार नाही. त्यांची पदोपदी आठवण होणे अगदी अपरिहार्य आहे. त्यांचे पहिले आणि दुर्दैवाने शेवटचे ठरलेले संगीत धन्य ते गायनी कळा" (सम्राट तानसेन) हे नाटक आज रंगभूमी गाजवीत आहे आणि त्यांच्या जिवंत स्मारकाचा मान मिळवीत आहे. आमच्या ह्या अष्टपैलू सुहृदाला ही आमची स्मृत्यंजली.

-- दीनानाथ दलाल

कलाकार पत्नी आपल्या मुलांना प्रेम देऊ शकली नाहीत, म्हणून तो अपराधी बनला व तुरुंगात गेला! ह्या मुलाने आपल्या पतितावस्थेचे हे कारण आत्मचरित्र लिहूनच जगाच्या वेशीवर टांगले आहे. अनौरस मारलीन मन्रो आत्महत्त्या करून मेली, त्याचेही कारण असेच काही सांगतात. आई-बापांचे सुख नाही, घराचा संस्कार नाही, असाच काही निष्कर्ष क्लेअर बूथ ल्यूसने मारलीनवरील आपल्या लेखात काढला आहे. जॅकेलिनने हे विलक्षण लग्न केले, त्याचेही कारण ह्याच जातीचे दिले जाते. तिची पितृप्रेमाची भूक भागली नव्हती. तिला बापाचे प्रेम हवे होते! आता तिला बापाचे प्रेम काय हा धनाढ्य म्हाताराच देऊ शकणार होता? जॅकीचा सासरा तिला हे प्रेम देऊ शकला नसता काय? जॅकीवर "बापाचे प्रेम" करू शकणारे म्हातारे अमेरिकेत काय थोडे असतील! पण जॅकीला बापाचे प्रेम पाहिजे होते ते नवऱ्याकडून! तेव्हा "बापाच्या प्रेमा"चा हा घोटाळा उलगडावा कसा? प्रत्यक्ष फ्रॉइडला तरी ते शक्य होईल का? पण बापाच्या वयाचा एक नवरा जॅकीने केला हे मात्र खरे. ह्या "बाबा"ची आणि केनेडी दंपतीची ओळख जुनी होती. जॅकेलिनची वहीण ली रॅड्झविल (Lee Radziwill) हिचा तर ओनॅसिस बाबा चांगलाच मित्र होता. १९६३ मध्ये जॅकीचे पॅट्रिक नावाचे अल्पवयीन मूल गेले. तेव्हा दुःखीकष्टी जॅकीच्या जीवाला विरंगुळा देण्यासाठी ओनॅसिस दादाने "ख्रिस्तिना" ही आपली आनंदनौका तिच्या दिमतीस दिली. ह्या नौकेवरून तिने भूमध्य समुद्रावर फेरफटका केला. मृत बालकाच्या स्मृती येथेच तिने घोळविल्या व येथेच टिपे गाळत तिने दुःखाचे श्वास सोडले. आणि काय सांगावे? ह्याच नौकेवर जॅकीने ओनॅसिससंगे आपला दुसरा मधुचंद्र साजरा केला. आपल्या आईचा हा मधुचंद्र पाहून लहानग्या पॅट्रिकच्या आत्म्याला काय वाटले असेल? जॉन केनेडीच्या आत्म्याला काय वाटले असेल? आणि प्रत्यक्ष जॅकेलिनच्या आत्म्याला काय वाटले असेल? पण राजविलासी वैभवाने नटलेली "ख्रिस्तिना" ही विसरण्याचीच जागा होती. कीर्ती, अपकीर्ती, मुलगा, नवरा, सारे तिथे विसरलेलीच होती. पण कां? लग्नापूर्वी म्हणे हिशेबी ओनॅसिसने स्वतःची वैद्यकीय तपासणी करून घेतली; पण वैद्यकीय तपासणीमुळे बासष्टचे काही बावीस तर होत नाहीत हे अंतर जॅकेलिनला कळणारच तिथे वैद्य काय रडणार!

बाबा ओनॅसिस बासष्टचा असला तरी पन्नासचा दिसतो आणि चाळीशीत असल्यासारखा वागतो (Looks fifty and acts forty) अशी त्याची भलावण करण्यात आली आहे. तो खेळाडू आहे, "स्कीईंग" उत्तम करतो, पोट वाढू देत नाही, वगैरे त्याचे बरेच गुणवर्णन करण्यात येते. परंतु पोट न वाढलेला खेळाडू तरुण आणि पोट न वाढलेला खेळकर म्हातारा, ह्यातले अंतर शिल्लक रहावयाचे ते राहतेच! ओनॅसिस बुवा प्रथमदर्शनी ओबड धोबड वाटत असला तरी त्याच्यात विलक्षण आकर्षण शक्ती आहे, असेही म्हणतात–असली पाहिजे. जॅकेलिन केनेडी व वाणिज्य व्यवसाय शांतपणे करणाऱ्या आपल्या नवऱ्याला चुटकीसरशी सोडून मारिया कलास ह्यांनी हे सिद्धच केले आहे. मात्र ही आकर्षण शक्ती कसली आहे ते त्या बाया जाणोत की त्यांचा निर्माता जाणो.

ओनॅसिसशेटना मूल्यवान व सुंदर वस्तू जमविण्याचा मोठा नाद आहे म्हणतात. त्याच्या पहिल्या कुटुंबापासून झालेल्या मुलीचे नाव धारण करणारी विलासनौका "क्रिस्टिना" हा एक तरता राजवाडा असल्याचे सांगतात. ह्या आनंदनौकेवर लिझ आणि रिचर्ड बर्टन, (राजकन्या) मार्गारेट आणि टोनी (स्नोडन), ग्रेस (केली) आणि रेनियर (ग्रिमाल्डी), कॅरी ग्रॅण्ट व ग्रेटा गार्बो आणि शेवटी सर विन्स्टन चर्चिल व लेडी चर्चिल ह्यासारखी माणसे आली आणि विपुल आनंद प्राप्त करून गेली. धंदेवाल्यांना मोठी माणसे जोडावी लागतात आणि मोठ्या माणसांना धंदेवाईकांचा उपयोग होतो. परंतु जॅकेलिन केनेडी 'ख्रिस्तिना'वर जी गेली ती तिथलीच रहिवाशी झाली. ओनॅसिस श्रेष्ठींच्या मूल्यवान वस्तुसंग्रहालयातलीदेखील ही अतिमूल्यवान वस्तू होय असे माणसे म्हणाली. आणि येथेच जॅकेलिन केनेडीचे अवमूल्यन झाले. एका थोर अमेरिकन अध्यक्षाची बायको, स्वर्गात जन्मलेल्या कुणा ग्रीक नबाबाच्या राणीवंशात गेली. जॉन केनेडीची प्रिय सहचरी आणि सखी म्हणून लोक तिच्याकडे पहात होते. अशा साहचर्यात निष्कलंक निष्ठा, आणि आमरण प्रेम अपेक्षित असते. ही अपेक्षा थोर स्त्री-पुरुषांकडून मनुष्यजातीने नेहमी ठेवलेली आहे. हे प्रेम माणसाला माणूस ठेवणारा व देवत्वाप्रत नेणाऱ्या आदर्शवादाचे आहे. पण येथे जॅकेलिन उणी भरली. ती आदर्श स्त्रीप्रमाणे, आदर्श पत्नीप्रमाणे किंवा आदर्श विधवेप्रमाणे वागली नाही. लोकांच्या दृष्टीने जॅकेलिन केनेडी हे एक सुंदर स्वप्न होते. भीषण शोकांतामुळे अधिकच भेदक बनलेली ती एक परीकथा होती. जॉन हा त्या परिकथेतील राजपुत्र होता. तो सुंदर होता, कर्तृत्ववान होता व बुद्धीवान होता. त्या देखण्या आणि तरीही धिप्पाड पुरुषासमोर जॅकी एखाद्या लहानग्या बाहुलीसारखी दिसत असे. (ओनॅसिस तिच्यापुढे लहानगा विदुषक दिसतो.) ह्या कोमल बाहुलीच्या अंगावर तिच्या पतीचे रक्त सांडले. तिच्याच मांडीवर तो घायाळ होऊन पडला. तेव्हा एखाद्या निरुपाय झालेल्या वाघिणीसारखी ती संतप्त झाली. तिचा प्रिय जॉन तिच्या कवेतून हिरावला गेला. एक सुखद स्वप्न भंगले. एक जोडी फुटली. एक संपन्न संसार उध्वस्त झाला. जॉन गेला आणि दोन कोवळ्या अर्भकांना पोटाशी घेऊन जॅकेलिन मागे राहिली. पुरल्या जाणाऱ्या आपल्या पित्याला चिमणीसारखे तोंड करून त्या अजाण पोरांनी जी वंदना दिली, ती तर






अनुक्रमणिका

रूगडाला रडवील अशी होती. जॅकेलिन तेव्हा वीरपत्नीप्रमाणे वागली. तिची कृती धीरगंभीर होती. तिने आपले दुःख जॉनच्या अंकुराकडे पाहून गिळले होते. ती एका हुतात्म्याची विधवा होती. रॉबर्ट केनेडी-सारख्या प्रेमळ दीराच्या आधारावर ती अद्याप उभी होती. एकांतात आपल्या वीर पतीसाठी ही कष्टी विधवा अश्रू ढाळत होती, त्याच्या आठवणी आळवीत होती व आपल्या पिलांना वाढवीत होती. "There will not be another John" जॉनसारखा दुसरा कोणी होणे नाही, असे उत्कट उद्गार त्याच्या मृत्यूनंतर तिने काढले होते. त्याचाच आदर्शवाद ती जपणार होती, असे काही लोकांना वाटत होते. पाचव्या मार्गावर (Fifth Avenue) राहाणाऱ्या ह्या यक्ष-स्त्रीकडे लोक प्रेमाने, आदराने, कौतुकाने पहात होते. तिच्याविषयी माणसाना गाढ सहानुभूती होती. तिची प्रत्येक हालचाल ते टिपीत होते. ती कुणी सामान्य स्त्री नव्हती! ती होती जॉन केनेडीची विधवा जॅकेलिन केनेडी! जी वर्षे गेली ती अद्याप त्याचीच विधवा होती!

आणि मग काही भलतेच झाले. "तो सद्‌गृहस्थसुद्धा नाही!" (He is not even a gentleman") ही ज्याची कीर्ती अशा एका रंगेल येरड्याशी जॅकेलिनने लग्न केले. माणसे नव्याने जॅकेलिनचा जुना इतिहास आठवू लागली. त्यांना तिच्या महागड्या सवयी आठवल्या. तिच्या आईचा इतिहास आठवला. बहिणींचा इतिहास आठवला. जॅकेलिनला "व्हाईट हाऊस" मधले वैभवशाली आयुष्य आवडले, पण तसा जॉन केनेडीच्या राजकीय कर्तृत्वात तिचा वाटा नव्हता, तिला एकूण राजकारणाचा कंटाळाच होता. ती त्याची खऱ्या अर्थाने सहचरी नव्हती, असेही माणसे बोलू लागली. जुन्या घटनांचा ती नवा अर्थ लावू लागली. जॉन केनेडीची धावत्या वाहनात हत्या झाली, तेव्हाची एक चित्रमालिका वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाली होती. गोळीबार झाल्यावर उघड्या टपाच्या मोटर गाडीतून मागच्या अंगाने जॅकेलिन रांगत निघाली आहे, असे त्यात एक चित्र होते. जॉनचे डोके जॅकेलिनच्या मांडीवर होते ना? मग त्याला मरणोन्मुख एकटा टाकून ती कुठे निघाली होती? हे चित्र मी पाहिले आहे. तेव्हाही मला वाटले होते की, प्राणरक्षणासाठी एका उपजत बुद्धीने पळू पाहाणाऱ्या माणसाचे हे चित्र असू शकेल. ह्या चित्राविषयी जॅकेलिनला वृत्तपत्र-कारानी प्रश्न केला, तेव्हा तिने उत्तर दिले: "तेव्हाचे सगळे मला नीट आठवत नाही."

ह्या गोष्टी आता लोकांना आठवल्या. जॅकेलिनवर टीका होऊ लागली. जॅकेलिनने जे केले ते करायला ती स्वतंत्र होती खरी, पण लोकही टीका करायला स्वतंत्र होते. बरे, त्यांची टीका तशी अकारण किंवा द्वेषमूलकही नव्हती. तो उद्‌गार आश्चर्याचा व दुःखाचा होता. हे आश्चर्य व दुःख एक कल्पना-स्वप्न भंगल्याविषयी होते. एक आदर्श भ्रष्ट झाल्याविषयी व निखळून पडल्याविषयी होते. मनुष्य हा आदर्श-वादावर नेहमीच प्रेम करीत आला आहे. म्हणूनच तो मनुष्य राहिला आहे. माण-साना वीराविषयी, हुतात्म्याविषयी, संता-विषयी व साध्वीविषयी नेहमीच प्रेमादर वाटतो. अगदी मागासलेल्या व रानटी मानल्या गेलेल्या समाजातही शौर्य, धैर्य, निष्ठा, त्याग, सेवा ह्या गुणाना मोठा मान आहे. तर मग सुसंस्कृत माणसानी हे गुण किती मानावेत. सुसंस्कृतीचा हे गुण हाच तर मूळ आधार आहे. आणि ह्या गुणात जॅकी कमी पडली. म्हणून तिच्यावर टीका झाली. निष्कलंक पातिव्रत्याला, व अढळ निष्ठेला लोकानी विशेष प्रकारे मानू नये काय? तसे त्यानी मानावे ह्यातच खरे म्हणजे त्यांची माणुसकी आहे. माझ्या पहाण्यातली एक गोष्ट मला आठवते. माझ्या परिचयातल्या एका सुशील व सुंदर मुलीचे माझ्या एका मित्राशी लग्न झाले. हा माझा मित्र एक अतिशय तरतरीत असा प्राध्यापक होता. दुर्दैवाने लग्न झाल्या-पासून सरासरी वर्षभराच्या आतच तो गेला. तेव्हा त्याच्या बायकोला दिवस होते. पुढे तिला मुलगा झाला. पण ह्या कोवळ्या मुलीच्या संसाराचे स्मशान बनले. पुढे दुसऱ्या कुणी तर काय पण ह्या मुलीच्या प्रेमळ सासू-सासऱ्यांनीच तिला कळवळून आग्रह केला की दुसरे लग्न कर. उभा जन्म असा काढू नकोस. त्यावर त्या मुलीने उत्तर दिले, "ती गोष्टच बोलू नका! आज मला तुमच्यासारखे प्रेमळ सासू-सासरे आणि दीर मिळाले आहेत. उद्या तेही कदाचित मिळणार नाहीत."

ही मुलगी आजही जीवित आहे. तिने पुनर्लग्न केले असते, तर कुणी तिला दोष दिला नसता. पण त्या एका पुरुषाच्या प्रेमाशीच तिने निष्ठा ठेवली. अशा प्रखर चारित्र्याच्या पतिव्रतेविषयी लोकाना परमादर वाटला तर त्यात चुकले कुठे! आदर्श केवळ पुस्तकात राहून उपयोगी येत नाहीत. ते सजीव माणसांच्या कृतीतून साकार व्हावे लागतात. जसे ते माझ्या मित्रपत्नीच्या कृतीतून साकार झाले. आणि इथेच जॅकेलिन केनेडी कमी पडली!

● ● ●

# साहित्यिक  पानपुरी !!

## छापा, पण......

आचार्य अत्रे हे बेळगांवच्या पत्रकार परिषदेचे अध्यक्ष होते. रात्री विषयनियामक समितीची बैठक भरली होती. "नवाकाळ"चे संपादक श्री. अप्पासाहेब खाडिलकर यांनी कोणतासा मुद्दा मांडला व तो ' पाईंट ऑफ ऑर्डर ' नाही, असे आचार्य अत्र्यांनी सांगितले. पण हे 'रूलिंग' आहे, असे कांही त्यांनी स्पष्ट सांगितले नाही. त्यावर अप्पासाहेबांनी विचारले, "या मुद्यावर अध्यक्षांनी आपले 'रूलिंग' दिले, असे मी माझ्या वृत्तपत्रात छापू काय ?"

यावर अत्र्यांनी उत्तर दिले, " छापा, पण "नवाकाळ" मधील टाईप केव्हा केव्हा नीट उठत नाही, तेव्हा अध्यक्षांनी रूलिंग दिले, असे म्हणताना 'रूलिंग' या शब्दातील 'रू' नीट दिसेल, अशी काळजी घ्या !"

☆ ☆

## बापाचा माल

एकदा जयवंत दळवी, रमेश मंत्री आणि गुजराती कथा लेखक चुन्नीलाल मडिया एका उपाहारगृहात गेले. मडिया म्हणाले, "आपण आज 'उपमा' घेणार बुवा !"

तेव्हा दळवीनी म्हटले, " बरोबर आहे, साहित्यिक म्हटला म्हणजे त्याला 'उपमा'च आवडणार."

"या 'उपम्यात' आहे काय ? 'उपमा कालिदासस्य'—मंत्री म्हणाले."

"काय योगायोग आहे पहा ! माझ्या वडिलांचे नावही ' कालिदास'च आहे, " मडियानी म्हटले.

इतक्यात 'उपमा' आला. तेव्हा दळवी, मडियाना म्हणाले, "मग बरोबर आहे. आपल्या बापाचाच माल आहे, म्हणून आता तुम्हाला 'उपमा' खायला काही हरकत नाही."

☆ ☆

## जोडे आणि जोड्या

श्री. वि. स. खांडेकर हे एकदा एका लग्न-समारंभाला गेले होते. समारंभ व्यवस्थित पार पडल्यावर ते आपल्या चपला घालण्यासाठी कोपऱ्यात गेले. तो तिथं भला-मोठा चपलांचा ढीग त्यांना दिसून आला. त्यांना त्यांची एक चप्पल सापडली. परंतु दुसरी काही केल्या सापडेना ! त्यावर खांडेकर थोडेसे मिष्किलतेनं उद्गारले, "इथं जोडे पुष्कळ आहेत, पण जोडया जमविणं कठीण झालंय !"

☆ ☆

## शराब आणि सरबत

"प्रसाद" मासिकाच्या संपादकत्रयीत श्री. य. गो. जोशी आणि मामासाहेब दांडेकर यांच्या बरोबर श्री. स. आ. जोगळेकरही होते. पहिले दोघे जितके सोवळे, शुचिर्भूत, तितकेच जोगळेकर रंगीले म्हणून प्रसिद्ध होते. काही लोकांना ही त्रयी मोठी विचित्र वाटत असे. एकदा जोगळेकराना त्यांच्या एका मित्राने हटकलेच, "आपल्या तिघांचे त्रिकूट शोभत नाही बुवा !"

तेव्हा जोगळेकर हसून म्हणाले, "जोशीबुवानी आणि दांडेकरानी त्यांचे नफा-नुकसान पाहून घ्यावे. माझा मात्र एक फायदा आहे की मी त्यांच्या बरोबर बसून शराब प्यायलो, तरी लोक म्हणतील—जोगळेकर सरबत पीत आहेत."

☆ ☆

## वाढलेल्या वजनावर रामबाण

पु. ल. देशपांडे एकदा नाशिकला आले असता त्यांनी डॉ. अ. वा. वर्टींची भेट घेतली. त्यांची ही भेट पांच वर्षात होत होती. ह्या अवधीत डॉ. वर्टी रोडावले आहेत, तर पु. लं. चे शरीर फुगलेले आहे. साहजिकच पु. ल. वर्टींना म्हणाले, "डॉ. तुमचं वजन कमी झालेलं दिसतंय. तुम्ही कोणता उपाय अमलात आणला, ते तरी सांगा की !"

डॉ. वर्टींनी थोडा वेळ विचार केला, आणि म्हणाले, " डॉक्टर म्हणून नाही, पण साहित्यिक म्हणून सल्ला देतो. तो म्हणजे, तुम्ही एक स्वतःचं मासिक काढा."

☆ ☆

## उर्दू भाषेचा महिमा

मराठी भाषेवर कवि माधव ज्युलियन ह्यांचे अतोनात प्रेम होते. मराठी भाषा सुधारावी, भाषेची शब्दसंपत्ती वाढावी. भाषा शुद्ध व्हावी, ह्यासाठी त्यांनी जन्मभर प्रयत्न केले. एकदा त्यांच्या येथे एक खांसाहेब आले आणि म्हणाले, " उर्दू भाषेनेच मराठी भाषेला संपन्न केले आहे. इतकेच नाही तर अनेक विद्या मुसलमानानीच हिंदूंना शिकविल्या. उदाहरणार्थ—छावणी, शिपाई, लढाई हे शब्द पहा !"

त्यावर माधवराव म्हणाले, " बरोबर आहे ! खुनी, गुन्हेगार, बदमाश वगैरे शब्दही उर्दूभाषेतीलच ना ?"

खांसाहेब मग निरुत्तरच झाले आणि लवकरच खाली मान घालून निघून गेले.

☆ ☆

## कोण जाणे ?

एकदा प्रा. वि. मा. दी. पटवर्धन यांचे गडकरी स्मृतिदिनानिमित्त भाषण झाले. प्रास्ताविकात ते म्हणाले, "माझ्या व्याख्यानाचा विषय होता—"एकच प्याला, एक दृष्टिकोण", पण प्रसिद्ध झालंय 'एकच प्याला, एक दृष्टी' आता ह्यातला 'कोण' कुठं गेला कोण जाणे!"

—श. शि. पेंढारकर



अनुक्रमणिका







अनुक्रमणिका

—रवींद्र पिंगे

## पूर्वकथासूत्र

ताई देवधरणीची गाय कापल्याचा आरोप चिंबाव्याच्या मुसलमान मोहल्ल्यावर आला आणि गावातल्या गावात वाकडेपणा नको म्हणून महंमद मास्तराने किंमत भरून देण्याची तयारी दर्शविली; पण वर्वेकाका आणि त्यांच्या गटातील लोकांना ती तडजोड पटेना म्हणून त्यांनी राजापूरच्या वकिलाच्या सल्ल्यानुसार पोलिसांकडे तक्रार नोंदवली. फौजदाराने महंमद मास्तरलाच धारेवर धरले आणि त्याची अप्रतिष्ठा केली; पण नंतर गाय परत आल्याचे समजले आणि या घटनेच्या प्रतिक्रियेला सुरुवात झाली. मुसलमान मोहल्लेवाल्यांची बैठक होऊन या प्रकाराचा सूड उगविण्याचे ठरले. अबूवकर शेठच्या भक्कम पाठिंब्याच्या आधारावर त्यांनी चिंबावे गावातून सर्व हिंदूंनी निघून गेले पाहिजे अशी ताकीद दिली आणि ती जरब दाखवून अमलातही आणली. गावची सर्व हिंदू कुटुंबे चिंबावे सोडून बाहेर गेली आणि एका मोकळ्या जागेत त्यांनी आपापले संसार थाटले. आता पुढे वाचा—



## [ १४ ]

नव्या धोतराचा काच्या मारून मंजिनाथ काकांच्या दारात पिशवी घेऊन हजर झाला.

"अरे वा, आज अगदी फाकड दिसतोस रे! नि हे नवं पान की काय?"

"हो. तुमच्याकडे यायच्या दिवशीच घडी मोडेन असं घोकलवतं. त्याप्रमाणे आलो."

"बाळा, देवाला तरी जायचंस की नाही? काकाकडे यायला नवं पान कशास रे हवं?"

"तुम्हीच आमचे देव नि तुम्हीच सर्व काही!" मंजिनाथ म्हणाला आणि पिशवीतले दोन केशरी पोपये काढून त्याने काकांच्या पुढे ठेवले. नंतर काकांच्या किडकिडीत पावलाना नमस्कार केला. त्याला प्रेमभराने दूर सारीत काका म्हणाले,

"अरे हो रे मंजि, आणखी चावटपणा करू नको. तुला पायाच पडायचं असेल तर आत बाजेवर काकू पडल्याय. तिच्या पाया पड. कल्याण होईल तुझं!"

"काकूंना वरा विसरेन मी? पण पहिल्या नमस्काराचा मान तुमचा. तो चुकता केला."

"तुला सांगितलं नं अधिक चावटपणा करायचा नाही म्हणून! बरं, ही फळं कुठली?"

"तुम्हीच ओळखा."

"कमाल करतोयस. मी रे कसं ओळखू?"

"सोपी गोष्ट आहे. अहो, ही आमच्या वागेची पहिली फळं."

"मूर्खा, मग अगोदर देवाला दाखवायचीस की मला द्यायचीस?"

"यंदा पहिला वार धरला. चार फळं लागली. अगदी डोळ्यात तेल घालून मी पाखर केलीवती. त्या चार फळांपैकी एक देवापुढे ठेवलं. एक घरात ठेवलं. दोन तुम्हाला आणली. काकूला एक नि तुम्हाला एक."

"बरं, आता आणलीच आहेस फळं, तर ती आत नेऊन दे काकूला. पण तुझ्या अकलेची मात्र तारीफच केली पाहिजे — ह्या वयात आम्ही एकेक पोपया पचवणार आहोत नं! हत् लेका!"

ती दोन केशरी फळे उचलून मंजिनाथ आत काकूंकडे जाऊ लागला. इतक्यात काकानी त्याला हटकलं आणि विचारलं,

"ह्या पानाला काय दिलंस रे?"

"सव्वा तीन."

"काय, म्हणतोस काय?"

"खरंच. राजापुरात परवाच घेतलं, रेडीजशेटकडे."

"एका पानाला सव्वा तीन? पूर्वी हीच पानं आम्ही सव्वा रुपयानी घेतलीत."

"ते दिवस विसरा. पूर्वी दोन आण्यान् राईस प्लेट होती राजापुरात, साऱ्यांकडे तिला कुत्रं पुसत नव्हतं. नि आज तीच राईस प्लेट पाच आण्यास मिळत्याय, रांगेत तासभर घालवलात तर!"

"कसा काय निभाव लागणार रे मंजी आपला?"

"लोक थकल्यायत हो! पाच आण्याला राईस प्लेट कुणी कधी ऐकलीवती?—आणि हे सारं केव्हा? तर स्वातंत्र्याच्या काळात! माझ्या मुंजीत सहा आणे वाराच्या कापडाने शर्ट शिवलेवते. आज सव्वा रुपया वाराच्या खाली कापड दिसायला कबूल नाही! ह्यापुढे सरकार झालं, तरी ते काय रडणार?"

"नि तशात देशभर दंगे सुरू झाल्यायत!" काका सुन्नपणे म्हणाले.








**...अखेर त्या रात्री काका–काकू यांनी आपल्या आवडत्या दस्तुरी गावचा निरोप घेतला...**

"गरीबांचं चारी बाजूनी मरण आलंय बघा."

"आता कसं बोललास ? खरोखरीच गरीबांचं मरण ओढवलंय. गेले दोन दिवस माझ्या मनात एक नवीन कल्पना खेळतेय."

"मग सांगा की."

"तुला वेळ आहे नं ?"

"भरपूर."

"मग हरकत नाही. आता तूच सांग, आपण सुरुवात कशी केली ?"

"शून्यातून !"

"होय नं मंजी ? मुळात ही दस्तुरीची जागा. पण मोहल्लेवाल्यांनी हुसकावून लावल्यानंतर गेली आठ–नऊ वर्षं आपण गाळगाळ घाम गाळला नि आज ही चिंबावेकर मंडळींची छोटीशी वसाहत तयार झालीय्. म्हणजे काय, की प्रयत्न जोरदार केले नि डोकं वापरलं तर आपल्यालाही उर्जितावस्था येऊ शकते. अखेर तुळसकर मंडळींनी सड्यावर पोपये पिकवलेनीच की नाहीत ?"

"तुळसकरच कां, चिंबाव्यावरून आलेल्या प्रत्येकाने काही ना काही निर्माण करून दाखवलंय. आता वाटुळकरमामींची शक्ती ती किती ? आहे–आहे; नाही–नाही. पण मामींनीसुद्धा तीन पायल्या मिरच्या उभ्या केल्या !"

"कसं लाख बोललास?"

"कधी कधी मला वाटतं काका, आपण चिंबावं सोडलं हे एकापरीनं बरंच केलं. चिंबाव्यात आपली डबकी झालीवती. व इथे दस्तुरीजवळ आल्यापासून प्रत्येकाला कळून चुकलं, बाहेरचं जग वेगळं आहे; घाम गाळील तो जेवील."

"आणि तसंच झालंय. ह्या नव्या वस्तीत प्रत्येकाने कंबर कसून दाखवली—वाकी न करून सांगणार होते कुणाला ?—नाक दाबल्यावर प्रत्येकाचं तोंड उघडलं नि जो तो आपापल्या ओंजळीनं पाणी पिऊ लागला. खरोखर सांगतो मंजी, कधी कधी वाटतं बाबीशेट आज हवे होते. त्याना गाव काय करून दाखवू शकतो ते कळलं असतं नि धन्य वाटलं असतं."

"विशेषतः हिंदू लोक स्वतःच्या पायावर उभे राहिले ह्याचा त्याना चक्क गर्व झाला असता. हिंदूंच्या कल्याणासाठी त्यानी खूप खस्ता खाल्ल्या."

"आणि आता तर आपण स्वतंत्र झालो !"

"त्याचं तर त्याना जास्तीच कौतुक वाटलं असतं. त्यानी वॉर फंडाला शंभर रुपये दिले; नाही म्हणत नाही मी. पण ते तोंडं वाकडी करीत; नाईलाजास्तव. पण भाऊ तेंडुलकरांपासून त्यानी सर्वांना हसत मदत केलीवती."

"माझी नवी कल्पना सांगणार होतो मी—"

"अरेच्या, ते राहूनच गेलं. सांगा तरी—"

"चार महिन्यांपूर्वी आपला देश स्वतंत्र झाला. पण आज परिस्थिती काय आहे ?"

"चारांची तोंडं लागल्यायत चार दिशाना."

"कसं लाख बोललास मंजी ! ह्या हिंदु–मुसलमानांच्या दंगलीनी तर तोंडाची चवच घालवल्याय. खरं ना ?"

" ' दंगली ' हा काय शब्द वापरलात काका ? अहो कत्तली म्हणा कत्तली."





अनुक्रमणिका





"त्याचा अर्थ तोच रे."

"वा ! तोच कसा असेल. नौखालीत लक्षावधी हिंदू बायका-पोरांचे जीव घेतलंनी, त्याला काय दंगल म्हणणार ? अहो, कत्तल ती !"

"मुद्दा तो नाही. मुद्दा असा आहे की आपण इथं बसून काय करणार ?"

"तुम्हीच म्हणाला नव्हतात का शाळेच्या गॅदरींगच्या वेळी, की हिन्दू लोकांच्या हातून जर दुसरं काही होत नसेल तर त्यानी निदान बलोपासना तरी केली पाहिजे म्हणून ?"

"तू पण अगदी शब्दन् शब्द लक्षात ठेवलायस !"

"ह्या कत्तलीचे रिपोर्ट वाचायला लागल्यापासून मलासुद्धा असंच वाटायला लागलंय. आपण बलोपासना केली पाहिजे."

"म्हणजे बळाचं महत्त्व तुला पटलं एकूण."

"अगदी."

"चला, माझं अर्धं काम झालं !"

"म्हणजे ?"

"म्हणजे असं की तिकडे बंगाल्यात लक्षावधी हिंदू घरादाराना मुकल्यायत त्यांच्यापर्यंत आपण मदत पोहोचवूया, म्हणजे आपो-आपच त्यांचं बळ वाढेल."

"कल्पना एकदम मान्य. पण इथे आमच्या कोकण्यांच्या ढुंगणा-वरचे पंचे नाहीत धड तिथे आम्ही दुसऱ्याना पितांबर काय नेसवतो कर्म !"

"असं म्हणू नकोस. चिंबाव्यातून आपण निघालो तेव्हा आपल्यापाशी काय होतं ? पण ही नवी वाडी वसंवलीच की नाही आपण मोहल्लेवाल्यांच्या नाकावर टिच्चून ?"

"पण त्यावेळी स्वार्थ होता! आता परमार्थ आहे."

"असे फाटे फोडू नकोस. यंदा वैशाखात आंब्याचं पहिलं फळ मिळणार की नाही ? आठ वर्षं होतील यंदा कलमं लावल्याला."

"मोहोर तरी मस्त आलाय."






"मग फळ हातात पडतंय. मी सांगतो."

"बरं, समजा की पडलं."

"तर मग पहिलं फळ आपण न खाता सगळे वाडीचे आंबे विकू एजंटामार्फत नि येईल ती रक्कम देऊ पाठवून त्या घरं मुकलेल्या हिंदूना. बंगालचे हिंदूसुद्धा आपलेच लागतात ना ?"

"अहो, हसं होईल आपलं. यंदाचं पहिलं वर्षं. सर्वांचे आंबे गोळा केले तरी दोनशांच्या वर दिडकी दिसायची नाही."

"प्रश्न तो नाही. त्या आपल्या लोकाना दिलासा मिळाल्याशी कारण."

"कसला दिलासा नि कसलं काय ! मदत बिदत ही मुंबैच्या शेटया लोकांची कामं. एक चेक फाडतील तर दहा हजार उभे करतील. आमचे मुळात दोनशे; तिथे पोंचीपर्यंत त्यातले दोन उरताना मारामार."

"असं गणित मांडू लागलो तर हिंदूना मिळायचे ते दोन रुपये सुद्धा मिळायचे नाहीत."

"असा नाही माझ्या बोलण्याचा अर्थ. आंबे विकून पैसे पाठ-वायचे म्हणाल तर पाठवा. मला आपला ह्यात भाबडेपणा दिसतोय."

"तुला काय दिसतं ह्याला महत्त्व नाही. हिंदूना मदत पोचली पाहिजे."

"पोचवा!"

"हा झाला माझ्या कल्पनेतला अर्धा भाग."

"म्हणजे अजून बाकी आहेच तर."

"तोही तुला सांगतो. चिंबाव्यातली आपली घरं आहेत की नाहीत,—"

"आता आणखी ती काय करूया ?"

"ती सध्या आपण वापरतोय काय?"

"नऊ वर्षं होतील आता—अजून नळेपरतणी झाली नाही त्यांची. केवढे शाप देत असतील त्या वास्तू !"

"चुकतोस तू ! चिंबाव्यातल्या आपल्या वास्तू शांत आहेत. यवनांच्या हातात गेल्या तरी त्या मूळ मालकाला शाप म्हणून कशा त्या द्यायच्या नाहीत. नि दिलानीच तर नव्या मालकाला देतील !"

"बरं. त्या वास्तूंचं काय ?"

"त्या वास्तू आता पुन्हा आपल्याच झाल्या! कारण आता आपण स्वतंत्र झालो. मोहल्लेवाल्यांचे बाप आता त्या परत करतील !"

"मग पुढे काय ?"

"आपण घरादाराना मुकलेल्या तिकडच्या पाच पंचवीस हिंदूना इकडे बोलवू या नि आपल्या जागा त्याना देऊन टाकू या."

"म्हणजे दोन हजार मैलांवरून त्या बेघर मंडळीनी ह्या कात-ळात तंगडचा तोडत यायचं—कां ?—तर दोन घाष्टया मिळाव्यात म्हणून !"

"असं करता करताच हा भाग पुन्हा वसवला जाईल. ती माणसं घरं नीट लावतील, आगरं शिंपतील, त्या धर्मानं का होईना पण लोकाना चार पैसे सुटतील. आपल्याला तरी दुसरं काय हवंय ?"




"भाषेपासून अडचणींना सुरवात होईल. माहीत आहे नं ?"

"चिवावं सोडलं तेव्हा काय अडचणी कमी होत्या ? पण सर्वांनी नेट लावून ही दस्तुरीवाडी उभारलीच कि नाही ? तशीच नवीन माणसं चिवावं पुन्हा उभारतील."

"एक माणूस कोकणात कायमच्या वस्तीला यायचा नाही—माझी खात्री आहे."

"असं घोकत रहा म्हणजे कोकणची चांगलीच उद्धारगत होईल ! नालायक !"

"असे संतापू नका काका."

"नको—संतापू नको—तुझ्या गळ्यात माळा घालतो त्याऐवजी."

काका तापले. आतल्या बाजेवर पडलेल्या काकूंनी मंजिनाथला आत बोलावून घेतलं.

"नमस्कार करतो काकू !"

"त्यांच्या केलास नं, त्यातच मी आल्ये. बरं; नवं-जुनं काही?"

"काय असायचंय ? काकांची मतं तुम्ही ऐकताहातच."

"त्यांच्या परीनं त्यांचं बरोबर आहे. कोकणात वस्ती वाढवायची तर तोच एक मार्ग आहे. आपले लोक इकडे यायला कबूल नाहीत, तर ते लोक तरी येऊद्यात."

"हा प्रश्न गावकीपुढेच ठेवलेला बरा."

"ठेव ना. पण निर्णय लागू दे, एकदाचा."

"तुमची तब्बेत कशीय ?"

"कशी असायच्याय ? चार दिवस गुण येतो. पुन्हा आपले पहिले पाढे पंचावन्न."

"नाहीतरी पाठीच्या कण्याचं दुखणं वाईटच."

"दुखण्याला मी डरत नाही रे, मला ह्यांची ओढाताण बघवत नाही."

"पण काकाना कुठे वाटत्याय ओढाताण ?"

"चालायचंच. जळ्ळं घरं शाकारताना कोण काय पडत नाही, की घसरत नाही ? पण माझ्या प्रारब्धात जर आहे असं वर्षोन् वर्षं लोळायचं, तर त्याला अगदी धन्वंतरी झाला तरी कोण काय करणार ?"

"कधी तरी उठाल हो तुम्ही ह्या दुखण्यातून."

"मी तिला तेच सांगतोय." काका माजघरात येत म्हणाले, "दत्ताचा अंगारा कधी निष्फळ व्हायचा नाही."

"पण मी कधी नाही म्हटलं ?" काकूंनी हंसत विचारलं, "नि ह्या मंजिला इतक्या फायलावर घेतला तर आता गूळ तरी द्या त्याच्या हातावर."

"अरेच्या ! म्हणजे मुख्य ते न्हायलंच की !" काका बोलले आणि गुळासाठी डबे रापू लागले. काकांची धावपळ काकू कौतुकाने पाहू लागल्या. मंजिला कृतार्थ वाटलं. * *

**[ १५ ]**

दत्ताच्या पडवीवर सर्वात पहिली हजेरी आंधळ्या वैकुंठबाबांनी लावली. निळूनं विचारलं,

"काय बाबा, आज सर्वात अगुदर हजर तुमी !"

"आपल्याला घर काय नि देऊळ काय सगलं सारखां. सांवट गोठयाच्या भितीवर चढायची वाट बघत हुतो. ती चढली नि निघालु. म्हणलां. ऐकूयां तरी बोलणां."

"कुणाचे सांगाती आलांव ?"

"माझ्या सांगाती कोन येनार ?"

"हल्ली तुमाला थोडं थोडं दिसायला लागलंय हे खरां तर."

"कसलां काय ! आपला परकाश कुटला नि सांवट कुटली, इतकां दिसतां. माणूस नाय कळत."

"मला ओळखलंत ?"

"म्हंजे ? तू बाबीशेटाचा निळो नाय ?"

"म्हणजे तुमाला चांगलांच दिसतंय."

"नाय. मी आवाजीवरून ओलखलां. धा वर्षां झाली, पण तुझो आवाज कायम हां."

"लोक म्हणतात मी पोलीसात गेल्यापासून बदलला."

"जळ्ळे लोक सांगणार ! मी सांगतंय; तुझो आवाज अगदी कायम हां. बाबीशेटाच्या दुकानात घासलेट देताना जसो आवाज तुझो होतां, तसांच आज पन हाय. आयच्यान !"

"म्हणजे जग बदललां पन आमी आपले असेच."

"जग बदललांव म्हंजे काय भलतांच बदललां. दोन दिडक्यांची पिठी चिवाव्यात चार दिस पुरायची. आता चार दिस पिटलां खांवचां म्हंजे चवली हवी !"

"दिवस हे असे आल्यायत नि काकांनी नवाच खूळ काढलांय."

"पन काका खूळ काडणारा नाय. हां; बामण हाय तो."

"तुमाला नाय दृष्टी. तुमाला सांगून काय उपयोग ?"

त्यावर वैकुंठबाबा खिन्न हसले. आपण अडगळीसारखे पडलो आहोत हे त्यांना गेली तीस वर्षं जाणवत होतं.

वेळ जाऊ लागला तशी दत्ताची पडवी माणसानी भरू लागली. काका तेवढे दिसेनात. मंजिनाथानं विचारलं,

## रौप्य महोत्सवानिमित्त रौप्य—पदके

'दीपावली'च्या रौप्य–महोत्सव वर्षानिमित्त 'दीपावली'च्या लेखकांसाठी आम्ही खालील योजना सहर्ष जाहीर करीत आहोत:—

'दीपावली' साठी मार्च ६९ ते फेब्रुवारी ७० पर्यंतच्या अंकातून प्रसिद्ध होणाऱ्या साहित्यापैकी खालील प्रकारच्या सर्वोत्कृष्ट साहित्याला प्रत्येकी एकप्रमाणे सहा रौप्यपदके देण्यात येतील.

कादंबरीका, कथा, लेख (वैचारीक), कविता, एकांकिका, विनोदी साहित्य आणि प्रवास–वर्णनादि अन्य साहित्य.

**अधिक तपशील पुढील अंकांतून सविस्तर देण्यात येईल**

अनुक्रमणिका






"सगळे आले. काका कुठायत ?"

"त्यांना तोंड हाय ?"

"कां ? त्यांनी काय कुणाची चोरी केल्याय, की शिदळकी?"

"चोरी परवडली. पण काकांची नजर आमच्या उत्पन्नावर हाय. घारादारांवर हाय."

"तुम्ही काय बोलतांय काय ?"

"आमचां जाणाराय म्हणून बोलतांव."

"जाऊन जाऊन किती जाणाराय ? सगळ्या गावाचे फारफार तर दोन अडीचशे जातील. तीनशे म्हणजे डोक्यावरून पाणी गेलं."

"काकांचां म्हणना तरी काय ?"

"म्हणजे पुन्हा दशरथाचा राम कोण, इथपासून सुरुवात करा!"

"गावकी कुणी हाकारली ?"

"सगळे जमू देत. मग सांगतो. पण काका कां आले नाहीत?"

"ते मुळी येणारच नाहीत !"

"तुम्हाला कसं कळलं?"

"आठ वर्षां बॉम्बे पोलीसात होतो—मगरीचे दात मोजनारी माणसं आमी!"

प्रमुख ते सर्व जमल्यावर मंजिनाथानं काकांचं म्हणणं गावकीला समजावून सांगितलं. त्यावर निळूने म्होरकेपण घेऊन विचारलं,

"काकांनी वागवाडी किती केल्याय ?"

"काकांनी दारात दोन रोपे लावले, वाग-बीग काय नाही."

"दोन रोपे; नि तेसुद्धा रायवळ. म्हणजे एजंट फुकटसुद्धा घेणार नाय !"

"काकांना नाही पोर की टोर. कुणासाठी बाग लावणार ते ? म्हातारीसाठी ?" मंजिनाथनं विचारलं.

"तेंच मला हंवय्. काकाची स्वतःची इस्टेट नाय–आणि दुसऱ्याची बघवत नाय."

"दुसऱ्यांची इस्टेट बघवत नसती तर ह्या दस्तुरीगावाची मांडामांड त्यांनी कशाला केली असती ?"

"त्यांना थारा होताच कुठे ?

"ब्राम्हणभाई ते. लाथ मारलंनी असती तर पाण्याला तोटा नव्हता. पण त्यांनी ही भूमी आपली मानली."

"नि ह्या असल्या बोलण्यावर तुम्ही विश्वास ठेवा !"

"कां नाही ठेवायचा ?"

"जो आपली भूमी मानेल तो पाच दहा कलमां लावल्याशिवाय राहील ?"

"पुन्हा तेच ! ते निपुत्रिक आहेत म्हणून त्यांनी पसारा वाढवला नाही हे किती वेळ सांगायचं ?"

"असां आवाजी चढवून कशास बोलतांव ?"

"तुम्ही भाग पाडता. काकांची इच्छा साधी आहे. बंगाल-मधल्या हिंदूंना चार दिडक्या पाठवाव्यात असं त्यांचं म्हणणं—काय चुकलं त्यांचं ?"

"मग स्वतःचं घर विका नि पाठवा. गावाला शाणपण शिकवायला बामण नकु !"

"इथे ब्राम्हण जातीचा संबंध येतोच कुठें ? दंग्यात त्रास झालेल्या हिंदूंना मदत करा, इतकंच सांगताहेत ते."

"हो–हो; हिंदूना मदत करा—पण दुसऱ्यांच्या पैशांची."

"ज्याला वाटतं त्यानी मदत द्यावी. जबरदस्ती नाही."

"मी सर्वांना सांगतो. भटाच्या भुलावणीला बळी पडू नका."

"काय स्वार्थ पाहिलाय हो ह्यात काकांनी ?"

"भटां अशीच वागूंची. लोनी स्वतांक, पानी दुसऱ्यांक !"

"आनि परत मोठेपना ! पैसे कुनी पाठवलांव ? तर भटानं!

"बामण जिथे गेले, तिथे हाच सत्यनास केलानी."

"खरां म्हंजे आमच्या दस्तुरीगावास बामणाची जरूरीच नाय!

"नशिव, तुमास हे कललांव!"

"वाटेल तें बोलण्यात काय अर्थ आहे ? काका परशुरामासारखे उभे न राहाते, तर हा गाव आज दिसता तरी ?"

"नि शिवाय काका सांगतू चिवाव्याची घरां दुसऱ्यांक द्या ! काय खुळां नाय झालो हा बामण ?"

"बामण खुळा होनार ? तुमाला खुळा करील तो !"

"ठीक आहे. एकूण काय, तर काका म्हणतात त्याप्रमाणे हिंदूंना मदत नाही करायची ! नक्की ना ? नाही तर नंतर धावाधाव कराल. नेम नाही तुमचा."

"आमाला गावातून एक दिडकी पन नाय द्यायची. आम्ही चिवाव्यातून रातचे निघालो तेवा आमाला कुनी फुटकी कवडी तरी दिलीवती काय ? आता कां गप ?"

"तो काळ वेगळा होता. आता कसली होतायत् हिंदूंच्या."

"होतील, नायतर, नाय पन होतील. आमाला काय त्याचा?

"हिंदू तुमचे कोणी नव्हेत ?"

"नव्हेत ! काय म्हणणां हाय ?"

बोलणं इतक्यावर येऊन ठेपलं, तेंव्हा मंजिनाथानं हार मान्य केली. सगळी मंडळी घरोघर पोहोचली. हातातल्या काठीने दगड धोंडे चाचपत आंधळे वैकुंठबाबा हळू हळू चालले होते.

"काय वैकुंठबाबा, मग काय ठरलं ?"

काकांनी आसभास नसताना मागून हळूच विचारलेला प्रश्न कानी पडताच आंधळे बाबा थरकले.

"तुमी कुठं होतांव?" वैकुंठबाबांनी आश्चर्याने विचारलं. त्यावर काका उद्गारले,

"तुमच्या शेजारीच की !"

आणि बावांना काय वाटलं ह्याचा विचार न करता ते अंग चोरीत निघाले.

वाटुळकरांच्या पडवीत मामी मिरच्यांच्या ढिगासमोर बसल्या होत्या. काका येताना रेज्यातून पाहिल्यावर त्या पुढे होऊन म्हणाल्या,

"आज घाईतसे ?"

"अहो, घाई नसत्याय कधी आम्हाला ?"

"पण काही खास कामगिरीवर की काय ?"







अनुक्रमणिका

"चाललो नाही, आलो."

"आम्हाला सांगा तरी चार गोष्टी."

"यथावकाश सगळं काही कानावर येईल तुमच्या."

"ते नको. आम्हाला तुमच्याकडून पाहिजे."

"त्याचं असं आहे मामी, त्या बंगालच्या हिंदू लोकांना मदत मिळावी म्हणून खटपट चालल्याय माझी."

"इतक्या लांबच्यांचं बघता, पण आमची शकू मुंबैला अजून उजवत नाही, तिच्याकडे बघायला फावत नाही तुम्हाला."

"लक्षात आहे माझ्या."

"मुलीचे वडील असते, तर तुम्हाला बोलले नसते. पण आता तिचं बघणारं असं कोण आहे ?"

"आता इतकं बोललायतंच तर मुद्दाम बारीक लक्ष ठेवीन."

"दोन हजारांपर्यंत खर्चाची तयारी आहे माझी. शिवाय पाच तोळ्यांचा ऐवज ठेवलाय तिच्या वडिलांनी हो."

"म्हणजे जमणं त्यातल्या त्यात सोपं जाईल."

"खरं हो, पण कुणी तरी सखस्त पाहीजे नाही आपलं अशा व्येव्हारात ?"

मान डोलावून काकांनी काढता पाय घेतला आणि ते स्वतःच्या घरी आले. काकूंनी विचारलं,

"नीट संभाळून आलात ना ?"

"अगदी मांजराच्या पावलांनी."

"सभा केव्हढी होती ?"

"गांवढ्या गावची सभा ! असून असून असणाराय किती ? पंधरा-वीस टाळकी होती."

"तुम्ही कुठे होतात ?"

"सभा सुरू व्हायच्या अगोदर तीन तास जाऊन मी दत्ताच्या पोटमाळ्यावर लपून बसलोवतो."

"कुठे अडगळीत चढलावतां ! काही चिरडू कुठे डसलं असतं मग ?"

"चिरडू-काटा असल्या भानगडी दत्ताजवळ नाही खपत."

"बरं. ऐकलत सगळं ?"

"अगदी साग्रसंगीत."

"काय म्हणताहेत गाववाले ?"

"काय म्हणणार ? मदत देऊ नका म्हणाले. शिवाय—"

"शिवाय काय ?"

"शिवाय गावात ब्राम्हणाचं घर असण्याची आवश्यकताच नाही म्हणाले !"

"हे कुठलं नवं खूळ ?"

"आता स्वातंत्र्य आलं ना ?"

"त्याचा नि ब्राम्हणांचा काय संबंध ?"

"स्वातंत्र्य आणायला ब्राम्हण पाहीजे होते. आता राज्य करताना नको."

"ब्राम्हणांच्या मदतीशिवाय त्यांच्या देवानं तरी राज्य जमेल का ? "

"जमो वा न जमो, ते शक्तीच्या बळावर रेटतील हे नक्की."

"मग रेटा म्हणावं."

"आपल्या इच्छेचा प्रश्नच नाही. ते रेटणार."

"आणि ब्राम्हणांना घालवणार कुठे ?"

"त्यांचे देव उतरले पाहिजेत आम्हाला घालवयाला. सोन्या-सारखी नोकरी होती, ती सोडून कोकणात प्राण फुंकायला आलो. उपेक्षा, अपमान, हेटाळणी, सारं सारं सोसलं आणि आता नवीन वस्ती आकाराला येत्येय तेव्हा ही भूमी सोडून जाईन म्हणतेस ? विसर !"

"त्यांचा म्होरक्या हो कोण ?"

"निळू !"

"मेल्या म्हणावं इकडे बाबीशेटाच्या दुकानात तुला पुड्या बांधायचं जमेना तेव्हा तिकडे तोंड घेऊन गेलास. पिवळी पगडी झालास. बरं झालास तर झालास, पण चिरीमीरीत पकडला जावास ?"

"त्यालाही माझी ना नाही. तुमच्या कृत्यांची फळं तुम्ही भोगणार. पण बॉम्बे पोलीसातून झाडू मारली तेंव्हा मुठीत नाक घरून इथे आलास—नि आता विष पेरतोस !"

"मला तर बाई भयंकर भीती वाटते ?"

"कसली ?"

"त्यांनी मारेकरी वगैरे घातलेनी तर ?"

"चिंवाव्यात मोहल्लेवाल्यांनी मारेकरी घातलेनी. शेवटी काय हिशोब झाला ?"

"त्यावेळी मी घडकी होते हो ! आता मला नाही हलवत बोटभर. अशा वेळी काही झालंच, तर मी काय करायचं ?"

"देवावर हवाला टाकायचा !"

"टाकला ! पण पुढे काय ? मला चहा भरवण्यापासून माझी तयारी करावी लागते."

"पण जे कधी घडणारच नाही त्याची काळजी कशाला हवी?"

"आता तुम्ही काय करायचं ठरवलंय ते सांगा."

"मी हिंदूंना मदत पोचवणार.—ह्या दस्तुरीगावातून मदत पोचवणार !"

"दिडकी सोडणार नाहीत ही माणसं."

"बेश सोडतील."

"कसे ?"

"मी चिंवाव्यातून मोहल्लेवाल्यांना उभं करीन नि ते लोक आपल्या वास्तू परत द्यायला येतील असं करीन."

"मुसलमान आपली घरं परत देतील म्हणता ?"

"देतील. कारण त्यातच त्यांचं हित आहे."

"आता इतक्या वर्षांनंतर मोहल्लेवाले कुठून सुचले तुम्हाला ?"

"आता आपण स्वतंत्र लोक झालो. आता ते वेगळे नाहीत."

"ते लोक घरं देतीलसं खरंच वाटतं तुम्हाला ?"

"लोटांगणं घालीत येतील, नि हसत देतील !"

"भ्रम आहे तुमचा."

"वादविवाद कशास हवा ? घोडामैदान जवळ आहे !" काका म्हणाले आणि केळीच्या बुंध्यात पाय धुवायला गेले. नंतर त्यांनी पुडीतला अंगारा काढून स्वतःला लावला आणि एक बोट काकूंच्या भालप्रदेशावर टेकलं.

काकू निर्धास्त झाल्या.

[१६]

सदू न्हाव्याच्या पडवीचा उपयोग न्हावीकामाकडे क्वचितच व्हायचा. न्हाव्याचा खुंट व्यवस्थित चालावा इतकी दस्तुरीगावाच्या नव्या वस्तीची मिजास नव्हती. साहजिकच सदूच्या पडवीचा उपयोग गावगप्पा कुटायला सोईस्कर जागा पाहूनच होई. पोलीसातून गचांडी मिळालेल्या निळूनं सदूची पडवी हा आपला अड्डाच केला होता. पडवीवर आल्या-आल्या त्याने विषय काढला,

"काय, बामणास पाचर मारली की नाय ? अं, गावच्या उत्पन्नावर नजर ठेवतो काय काका ? म्हणावं आता घे, नि॰कर तुझं तोंड काळं."

"ते तुमी विसरा. काका सगळ्यांची बारशी जेवलाय."

"अरे, सोड बारशी जेवणेवाला ! इथली एक गवताची काडी बाहेर नाय जाणार."

"माझं तुमी ऐका. काका कुठून तरी चावी मारणार नि आपलं शब्द खरा करणार."

"ते दिवस गेले. आता निळू कॉन्स्टेबलशी सामना हाय. साले मरणार कोण नि भाव खाणार कोण ! नि वर हा बामण म्हणतो, चिंवाव्याची घरं त्या हिंदूंना देऊन टाका ! जसा काय आमची घरं म्हंजे ह्याच्या बापाचाच माल !"

"काकांचा खरा हेतू काय ?"

"आपले नावाचा डंका वाजवायचा—दुसऱ्यांचे जीवावर ! बामण हाय तो !"

"नाही. कुणीकडून चार टकली इथे यावीत नि पुन्हा आपली कोकणची पेठ गाजावी. बस्स !"

"तुमी दाखवायचे दात पाहीले; खायाचे नाय बघितले. ते बघा अगुदर."

"काका तसा माणूस नाय."

"तुम्ही न्हावी म्हंजे मिनटात शेरा मारून मोकळे होणार !"

"ह्या वस्तीला किती वर्षं झाली ?"

"नऊ. हिटलेर होता नाय तेव्हा ?"

"बरोबर. आम्ही काकांना गेली नऊ वर्षं अशी जवळून बघतोय. त्यांची जातच वेगळी."

"खुशाल म्हणा ! पण नंतर कुले भाजले म्हणून बोंबटत येऊ नकात."

इतक्यात कुशाभाऊ शिरसाट डुलत डुलत तिथे आला. सदूने त्याला हाकारले,

"काय कुशाभाऊ, काय ओळख हाय ना गरीबाची ?"

"अरे वा ! गावातले तुम्ही; तुमची ओळख विसरून कसे चालेल ?"

"असां तोंडान म्हणतां पण मुंबैवाले काम देतं नायत गाववाल्यांना."

"परवा दाढीला येतो; नक्की."

"नुसत्या दाढीनं काय होणार ? ह्या मुक्कामात केस पण झाले

(पृष्ठ ४१ वर पहा)




अनेक स्वर,

एक गीत !



कोटी कोटी लोक,

एक देश !










# बाबल्याची कढई



**....उघडाबंब गणा धोतराचा सोगा खांद्यावर टाकून मध्येच बसलेल्या लोकांना तुडवीत सरळ आमच्या दिशेने येत होता....आता खरे नाटक रंगणार होते....प्रेक्षकात गोंधळ सुरू झाला....**

शेवटची घंटा झाल्याबरोबर पोरांनी घंटेचा ताल धरला. शाळेची बैठी इमारत त्यांनी डोक्यावर घेतली. एकेक पोर टोळक्यातून उड्या मारीत घराकडे धूम पळू लागले.

मी नकाशाची गुंडाळी हेडसरांच्या खोलीत ठेवायला गेलो. समोर सिंहाच्या जवळचाचे हेडमास्तर खाली वाकून टेबलावर पुस्तक चाळीत होते. खाली मान घातल्याने त्यांच्या मानेवरचे केस आयाळीसारखे भासले. हेडमास्तरांची वाटावी तशी भीती मनात निर्माण होईल असेच व्यक्तिमत्व मास्तरांना दैवाघरूनच लाभले होते. कदाचित् त्यासाठीच त्यांना सरळ हेडमास्तर करून टाकलं असावं, असं माझ्या मनात पुष्कळदा येऊन जाई.

आवाज होणार नाही अशा बेताने जगाची गुंडाळी मी कपाटावर ठेवली. खडूची पांढरी बोटे कपाटावर सवयीनं हापटली. ते सगळे पांढऱ्या नक्षीने चमकू लागले. तेथे ठसे उमटले. मी चोरून हेडमास्तरांकडे पहात पुसून काढले. बाहेर पडणार तोच गुहेतून गुरगुरत आवाज यावा तसा आवाज आला. मास्तरच बोलत होते.

"बापू मास्तर"—

"कोण मी ?"

"होय. तुम्हीच." आयाळीतून शब्द आले.

"इकडे या, समोर बसा."

वा. रां. सोनार

'पाटी घ्या आणि तोंडे फिरवा'च्या चालीवरं हेडमास्तरांनी मला समोरच्या खुर्चीत बसविले: मला आपोआप शेळीची कळा आली. हेडसरांनी आपला चेहरा वर केला. मला 'मेट्रो गोल्डनचा' सिनेमा सुरू झाल्यासारखे भासले. त्यांनी न बोलता, पण बोलण्यासाठी आपली मान उगाचच हवेत वेळावली. मी खाली मान घातली.

"तुम्हाला एका कामासाठी बोलावलंय्." गुरगुरीतून एक सलग वाक्य आले.

"कोणतं ?" मी पुटपुटलो.

"आज रिपोर्ट आलाय्. शाळा–तपासणीचा. चांगला आहे. पण——"

"पण काय –?" माझ्या छातीचे ठोके वाढले. माझ्या अकारण भीतीने हेडमास्तरांची सिंहमुद्रा प्रसरण पावल्यासारखी, वेडीवाकडी हलली. त्यांच्या मिशांनी खारीच्या शेपटीसारखी दोनतीन वळणे घेतली आणि त्या स्थिर झाल्या. डोळ्यांची बारीक हालचाल करीत ते आनंदाने गरजले, "अहो, तपासनीस तुमच्यावर खूष आहेत. म्हणाले शिक्षकअसा असावा: अधिक कामे द्या त्यांना–"

"अं ?–" मी एक आवंढा गिळला.

"घाबरू नका. तुम्हाला आवडेल ते. आपल्या शाळेला एकच उणीव आहे." हेडसर सांगू लागले, " आपल्या मुलांना नाटचाची गोडी नाही !" शेवटचा 'नाही ' माझ्याकडे पहात मास्तरांनी उगाच लांबवला. पुढे म्हणाले, "त्यांच्यात नाटचप्रेम निर्माण व्हायला हवं, काय ?"

"हो ! – त्यांच्यात नाटचप्रेम निर्माण व्हायला हवं." मी पाठ केल्यासारखं मागून म्हणालो.

"मग ?" पुन्हा हेडसर.

"नाटक म्हणजे एकूण कठीणच बुवा ! " मी धाडकन् बोलून गेलो; त्यामुळे मला नाटकातलं बरंच कळतं अशी हेडमास्तरांची खात्री झाली. त्यांना उत्साह चढला. हातातला टाक टेबलावर फेकून देत म्हणाले, "ते काही नाही. तुम्ही मुलांचं नाटक बसवा.

स्वतः भाग घ्या. वाटल्यास मला सांगा. मी घेतो भाग."

"तुम्ही ?" मी हा प्रश्न इतक्या ताडकन् विचारला की त्यांच्या या तयारीमुळे शाळेच्याच बालरंगभूमीला नाही तर उभ्या मराठी रंगभूमीलाच जणु मोठा धोका निर्माण होणार होता. मास्तरांच्या मिशांनी आता बारीक संतापाची वेगवेगळी वळणे घेतली. त्यांचा चेहरा वेडा–वाकडा हलला. माझ्या अकल्पित प्रश्नाने किंचित् हसला. मिशातून त्यांचे चमकणारे दात भयंकर हिंस्र वाटू लागले. मला वाटले हेडसर आता भडकणार. मी चूक सावरून घेण्यासाठी त्यांना विनवणीच्या सुरात म्हणालो,

"नाही म्हणजे, तुमच्यासारख्या ज्येष्ठ शिक्षकांनी, तेही मुलांच्या नाटकात..."

यावर ते किल्ली दिलेल्या खेळण्यासारखे गदगदा हलत हसले आणि किल्ली संपलेल्या यंत्रासारखेच पटकन् गप्प होत माझ्याकडे पहात म्हणाले, " बापू मास्तर, तुम्ही नाटक निवडाच. मी करतो काम. च्यायला फक्त पाठांतराची भानगड नको."

"पाठांतराशिवाय मग नाटकात काम कसं होणार ?" असा स्वतःला विचारल्यासारखा प्रश्न टाकीत पुढे नाटकाच्या इरसाल कंत्राटदाराच्या थाटात हेडमास्तरांना म्हणालो, "बरं, बघून घेऊ ते."

"बापू मास्तर, अहो, आम्हाला नुसत्या अभिनयाचं काम सांगा. अभिनयाचे प्रकार असतात ना म्हणे. कायिक, वाचिक का काय ते. त्यातला 'कायिक' चालेल आपल्याला. काय ?" त्यांचा शेवटचा 'काय' अशा धमकीच्या सुरात आला की मी पटकन् 'हो' म्हणून गेलो. विनोद केल्यासारखे स्वतःच खदखदत हसत राहीले. शेवटी थांबून म्हणाले, "मग, पहा एखादं नाटक!"

मी सुटका करून घेण्यासाठी अर्धवट ' हो ' म्हणून खुर्चीत चुळबुळलो; आणि 'बरंय्' म्हणत बाहेर पडलो.

मुलांनी बोध घ्यावा असे एक नाटक डोळ्यांसमोर येईना. प्रत्येक नाटकात कुठली ना कुठली अडचण उभी राही. एखाद्या नाटकात संभाषणाशिवाय राक्षसाचाच पार्ट असे. अर्थात् हेडसरांनी 'नाटकात काम करतो' म्हटले तरी, आणि त्यांना शोभणार असली तरी 'राक्षसा'ची भूमिका देणे माझ्या नोकरीच्या दृष्टीने कितपत योग्य होते ? शिवाय नाटकात काम करायचा त्यांचा उत्साह आवरणे हे माझ्या कक्षेपलीकडील काम होते. बरे, गाव असे लहान की तेथे नाटकासाठी हव्या तशा किमान वस्तू मिळणे अशक्य. गावात कधीकाळी तरुण पोरांनी एक नाटक-मंडळ चालविले होते असे नंतर् कळले. पण हव्या त्या ठिकाणी पातळांचे काठ घट्ट करायला साध्या पिना मिळत नाहीत या अडचणीमुळे स्त्रीपार्टीसुद्धा मिळणे कठीण झाले आणि एक दिवस गाव रंगभूमीला कायमचे पारखे झाले अशीही कुणी माहिती दिली.

शेवटी मोठ्या प्रयासाने 'भक्त प्रल्हाद' हे बालरंगभूमीला साजेसे नाटक डोळ्यापुढे आले. असल्या पौराणिक नाटकात पात्रांचे कपडेच अंगावरून काढून टाकले की आपोआप वेषभूषा तयार होते असे कैलासवासी ग्रामस्थ नाट्यमंडळाच्या एका हौशी कलावंताने मला सल्ला दिला. तसे हे नाटक बसवायला सोपे होते. खुद्द 'प्रल्हादा'ला जास्ती काम असले तरी उगाच मधेमधे ' नारायण' म्हणून त्याला वेळ मारून नेण्याची सोय होती. इतर पात्रांसाठी कमतरता नव्हती, हे नाटक निवडायचे मुख्य कारण म्हणजे यात आमच्या हेडसरांना अगदी अनुरूप भूमिका लाभणार होती. नाटकाच्या शेवटच्या भागात हिरण्यकश्यपूने भयंकर क्रोधात खांबावर घातलेली लाथ पडताच तो खांब फोडून बाहेर प्रकटणाऱ्या नरसिंहाची भूमिका ही मास्तरांची. यासाठी त्यांना वेगळ्या रंगभूषेची गरज नव्हती. वास्तविक त्यांचे सिंहाशी असलेल्या साम्यावरून मला हे नाटक आधीच सुचायला हवे होते. शिवाय अभिनयासाठी वेगळ्या परिश्रमांची गरज नव्हती. हपीसातून वर्गावर तणतणत जावे तसे खांबातून त्यांना बाहेर यायचे होते. गुरगुरण्याची कला त्यांना चांगलीच आत्मसात् झाली होती. एरवी हाताखालच्या मास्तरावर धावून जाण्यासारखे त्यांना प्रल्हादाच्या बापावर चालून जायचे होते. आणि महत्त्वाचे म्हणजे हे सगळं करताना त्यांना कोठेही संभाषण नव्हते. पाठांतराची काळजी नव्हती. प्रल्हादाच्या नाटकात नरसिंहाचा सिंहाचा वाटा असूनही त्याच्या तोंडी शब्द नसावेत, तेव्हा हेच नाटक ' न–नाट्य' पद्धतीने का बसवू नये असाही एक प्रगत विचार माझ्या मनात येऊन गेला. पण पहिल्याच प्रयोगात इतकी प्रगती अशा वातावरणात नको असं ठरविलं आणि शाळेच्या नाटकाचा नारळ फोडला.

जमलेल्या बाल कलावंतांना आणि काही प्रौढांना मी नाट्य-वस्तू समजावून सांगितली. कसलेला दुकानदार घडी न मोडता शालू उलगडून दाखवतो, तशा कौशल्याने मी नाट्य उलगडून दाखविले. बाल प्रल्हादाला संकटांच्या मालिकेतून जावे लागते ते एकेका संकटाची चर्चा करीत समजावून सांगितले. प्रल्हादाला उंच कड्यावरून खाली खोल दरीत फेकण्यात येते, त्याला हातपाय बांधून डांबून ठेवले जाते, उकळत्या तेलाच्या कढईत ढकलण्यात येते, इत्यादि प्रसंग कसे उभे करायचे ते सांगितले. हेडमास्तर मधूनमधून मिशी फेंदारून आपल्या भूमिकेसाठी आतापासूनच सज्ज होत असल्याचे दाखवू लागले.

बाल कलावंत तर श्वास रोखून ऐकत होते. गणा हलवायाचा खैराच्या खोडासारखा बावळ्या भिरीभिरी पहात प्रल्हादाची कथा ऐकत होता; म्हणजे ऐकल्या-






अनुक्रमणिका



**सौदा!....**

लग्नातला सूट
तू काल किती
फाटलाय मेला
म्हणून बोहारणीला
दिलास!...
बदल्यात त्याच्या
घेतलंस छोटं
'स्टीलचं' एक
पातेलं ... आणि
शिवाय वर
दोन चमचे!
ठीक आहे-पण उद्या
मीही असाच
जीर्ण शीर्ण झाल्यावर,
माझं असंच काही
करणार नाहीस ना!

— जयंत आंबेकर

सारखं दाखवीत होता. त्यात त्याचे लक्षच नव्हते. तो हळूच वाढल्या नखाने शेजारच्या कोवळ्या पोराला कुरतडत होता. पुन्हा त्या गावचेच नाही असा माझ्याकडे एकटक पहाण्याचं नाटक करीत होता. बावल्या म्हणजे सगळ्या शाळेला एक संकट होतं. घरी पाडलेल्या मिठाईची ताटं पालथी करतो म्हणून गणाने त्याला कोंडवाड्यात ठेवले होते. अभ्यास सोडला तर बावल्याला सगळ्या अवांतर गोष्टीत भारी रस होता. आताही सगळ्या पात्रांची निवड झाल्यावर बावल्या जागचा उठला. हात वर करीत सांगू लागला, "सर, आपल्याला द्या की काम!"

यावर सगळी पोरे फिक्कन हसली. बावल्या अन् नाटकात ?

"बावल्या, आता प्रल्हाद डोंगरावरनं कोसळतो, त्या डोंगराचं काम राहिलंय. करतोस ?" या माझ्या गंभीर सूचनेवर पोरांनी बाके वाजवून वर्ग डोक्यावर धरला. बावल्या माझ्याइतक्याच गंभीर-पणाने पोरांकडे दुर्लक्ष करीत म्हणाला,

"सर, कोणतंही द्या. पण नाटकात काम द्या. डोंगराचं तर डोंगराचं. वाटल्यास हेडसर लपतील त्या खांबाचं द्या."

त्याचा खालचा ओठ फुरफुरत राहिला. पोरे हसून उठली.

"बावल्या, काही तरी काय. क्षणभर नीट गपगार उभा राहात नाही एका जागी. खांबाचं तरी कसं द्यायचं रे ?" मी बावल्यांची समजूत काढण्यासाठी पुढे म्हणालो,

"शिवाय बावल्या, त्या भूमिकेत तुला हिरण्यकश्यपूच्या फार लाथा खाव्या लागतील. ड्रील मास्तर काय करणार आहेत ते."

यावर सगळा वर्ग पोट धरधरून हसू लागला. आणि बावल्या रागात तरतरा निघून गेला.

दुसऱ्या दिवसापासून नाटकाच्या तालमी सुरू झाल्या. एंका नाजुक पोराला प्रल्हाद करण्यात आले. हेडसरांनी रोज येण्याची गरज नव्हती. त्यांना ऐनवेळी खांबात कोंबून भागण्यासारखे होते. जसजसे नाटक पुढे सरकू लागले तसतशी एकेक अडचण उद्भवू लागली. त्यावर मात मिळवू लागलो. वेगवेगळ्या वस्तूंची जमवाजमव सुरू झाली. चांगले अंग धरू लागले नाटक.

एके दिवशी एक नवीनच अडचण निर्माण झाली. प्रल्हादाला उकळत्या तेलाच्या कढईत घालण्यात येते या भागापर्यंत नाटक आले आणि ते तेथेच अडकून पडले. आमच्या प्रल्हादाच्या मापाची कढई कुठून मिळवायची ? एवढी मोठी कढई फक्त हलवायाकडेच मिळू शकणार होती. आणि उभ्या गावात बावल्याच्या बापाचेच तेवढे दुकान होते. त्याच्याकडेच आम्हाला हवी तशी कढई होती. पण तो ती देणे शक्य नव्हते. कढई गणाचा प्राण होता. त्यावरच त्याचे उठणे-बसणे होते. गणा कढईवर बायकोपेक्षा अधिक प्रेम करतो असं बाबल्याच म्हणायचा.

तालमी चालू असताना एके दिवशी बावल्याला बोलावून घेतले. पुरातून आलेल्या ओंडक्यासारखा तो आला.

"बावल्या—"

"हुं!"

"एक पंचाईत झाली आहे."

"कशाची?"

"बावल्या तुझ्या हातात आहे."

"काय झालं सर ?"

खरे तर एव्हाना बावल्याला सगळे ठाऊक झाले होते. पण त्याला माझ्या-कडून वदवून हवे होते.

"तुझी कढई हवी होती."

"माझी? . माझी कसली सर. माझ्या बापाची."

"तेच तेच. पण तुझ्याकडची."

"आणि ती कशाला ? होटेल चाल-वायचं?"

बावल्याच्या विनोदाला सगळी तालीम हसली. मी कढईसारखा खोल आवाज करीत म्हणालो,

"बावल्या, अरे शेवटच्या अंकात प्रल्हादाला तेलाच्या उकळत्या तेलात टाकायचं असतं ना—"

"हात्तिच्या! सर, वाटल्यास आत्ताच टाकतो. चला."

बावल्या वाकड्यात शिरत होता. पोरे हसत होती. त्याला नाटकात न घेतल्याचा राग असा निघत होता.

"बावल्या, अरे शाळेच्या अब्रूचा प्रश्न आहे. शिवाय आपले हेडसर काम करायचे आहेत."

यावर आतापर्यंत बेरकीपणानं सुतकी चेहरा धरून असलेला बावल्या पोटात वाकून जोरजोरात हसू लागला. प्रल्हादा-सकट सगळी मुले घाबरलीच. मग थांबून तो म्हणाला,

"सर, कढईची व्यवस्था करतो."

"वाऽऽवा! बावल्या." मी त्याच्या पाठीवर हात मारणार तोच त्यानं माझा हवेतला हात धरून विचारलं,

अनुक्रमणिका







"पण एका अटीवर."

"अं ? अट ? कसली ?"

"मला नाटकात घ्या.—"

आता आली का पंचाईत. नाटक चांगले अर्ध्यावर बसत आले होते. आता पात्रांची फिरवाफिरवी कशी करायची ? बाबल्याला नाटकात घेण्यापेक्षा सरळ गणाच्या दुकानी जाऊन कढईत उडी घेणे मला सोपे वाटले. बाबल्या मुलखाचा इब्लीस होता. त्याला 'भूमिकेची समज' हा नाटयतंत्रातला प्रकार तर जाऊच द्या, पण साधी समजही नव्हती. इतक्या परिश्रमाने जमवून आणलेल्या नाटकाचा शेवट असा मध्येच एका कढईपायी होणार होता. कढईचे स्थान बाबल्याने बरोबर हेरले.

"मग काय सर, घेता ना ?– " पुन्हा बाबल्या.

"बाबल्या, सगळ्या भूमिका वाटल्या गेल्या रे !" दूध–वाटप केंद्रावर 'दूध संपले' हे जाहीर करणाऱ्या आवाजात मी बाबल्याची मनधरणी करू लागलो.

"मग राहीलं. हा चाललो–" बाबल्या वळला देखील.

"बाबल्या—"

" हे पहा—"

"हां ! तेही सांगतो. खांबाचं काम जमायचं नाही."

"आँ ?" सोबत पोरांचा सामुदायिक हशा.

"मग कुठली भूमिका करणार तू ?"

" आता प्रल्हादाचीच भूमिका हवीय्. दुसरी नको."

बाबल्याने आपली 'भूमिका' भलतीच बदलली होती. मी त्याच्याकडे पहात राहिलो ! असा प्रल्हाद ? थोराड ?

"बाबल्या, अरे प्रल्हाद इतका मोठा नव्हता रे !"

मी त्याला परावृत्त करायचा आटोकाट प्रयत्न करीत होतो. यावर तो पुन्हा कमरेतून दोन-तीनदा हिंदी सिनेमातल्या खलनायकासारखा टप्पाटप्याचं हसत म्हणाला, 'हें, हें, हें ऽ ! सर, प्रल्हाद नाहीतरी कुणी पाहिलाय् ? मग बिघडलं कुठे ? बोला, आणू कढई ?"

कढईचा सापळा लावून बाबल्यानं आम्हाला बरोबर अडकवून धरलं होतं. आमचं नाटक कढईशिवाय पुढे सरकणार नव्हतं. शेवटी नाईलाजाने बाबल्याला संमती दिली.

बाबल्या उडया मारीतच तीरासारखा पळत सुटला आणि दुसरे दिवशी नाटकाच्या तालमीला त्यानं डोक्यावरून भली मोठी कढई आणून टाकली. त्याला चांगलीच धाप लागली होती.

बाकावर बसत म्हणाला, "सर, एक करा. बापाला सांगू नका."

"म्हणजे काय बाबल्या ? गणाला न सांगताच आणलीस ?"

"मग काय सरळ मिळाली असती का? कमाल आहे."

गणाचा धिप्पाड आडवा देह माझ्यासमोरून भुताच्या वाऱ्यासारखा सरसरून गेला. अंगावर काटा उभा राहिला. गणा हलवाई हा भयंकर विघ्नाचा माणूस होता. ही नवी आफत बाबल्याने आणली होती.

"आपण नाटकच रद्द करू या का ?" मी निर्वाणीचं म्हणालो. यावर बाबल्यानं कढईचा एक कान हातात धरीत तारे तोडले,

"वा ऽ सर; कमाल झाली. एवढी जोखीम घेतली ती काय फुकट ? माझं काही नाही. तुम्ही नाटक रद्द केलं की कढई तुम्हीच चोरल्याचं सगळ्या गावात करीन."

-"बापरे ! कढई चो. . .चोरल्याचं? म्हणजे ?"

"मग काय करणार. आधीच गावात झालंय् कढई चोरीला गेल्याचं. तुम्हाला सांगून ठेवतो. नाटक पार पडेपर्यंत ही गोष्ट फुटता कामा नये. पुढचं पुढं —"

"बाबल्या ऽ —" मी देवळात शरणागत होऊन 'गणराया ऽ' वगैरे म्हणतो तसा म्हणालो. मला काही सुचेनासे झाले.

गणा हलवायाच्या कढईत आता रोज आमचे नाटक शिजू लागले. एकीकडे बाबल्याचे भयानक पाठांतर आणि दुसरीकडे गणाच्या अकस्मात आगमनाची भीती या दुहेरी संकटात मी चांगलाच घामाघूम होऊ लागलो.

इकडे उभ्या गावात कढई चोरीला गेल्याची बोंब झाली.

गणाचा धंदाच बसला. तो पिसाळल्यासारखा झाला असल्याची बातमी आली. माझ्या अंगाला दरदरून घाम फुटे. गणा कढईसाठी पायपीट करीत वकाल झोपड्या उसकटून काढू लागला. नदीकाठ तुडवला.

वडारांच्या वस्त्यांवर दम देऊन आला. तालुक्याला वर्दी दिली. एक-दोनदा पोलीसांच्या तुकड्याही गावाकडे येऊन गेल्या. कढई म्हणजे गणाचे पोट होते. तो चवताळलेल्या उपाशी वाघासारखा झाला.

आणि बावल्या हे मिटक्या मारीत मला सांगत होता. त्याच्या नाटय़प्रेमाने मला चांगलेच हैराण केले. नाटक आता चांगलेच रंग धरू लागले होते !

एकदाचा नाटकाचा दिवस उजाडला. शाळेच्या आवारात रंगमंच उभा राहिला. मुलांची झिम्मड उडाली. गॅसच्या बत्त्या पेटल्या. गावकरी मंडळी घोळक्या घोळक्याने येऊन जागा अडवू लागले. देवाचे नाटक म्हणून बायकांची गर्दी लोटली.

मी कपडेपटात, रंगमंचावर आणि प्रेक्षकात असा सारखा भिरभिरत होतो. हेडसर आले. त्यांची तिसऱ्या अंकातली भूमिका त्यांना समजावून सांगितली. त्यांनी मिशांनीच 'समजले' असल्याचे फेंदारले. बावल्या प्रल्हादाच्या वेषात आला. दही-हंडी फोडणारा रामा काय वाईट होता यापेक्षा असाही एक विचार मनात येऊन गेला.

एकदाचे सगळयांचे चेहरे रंगवून झाल्यावर मी विंगेतून प्रेक्षकात पाहू लागलो. मी सारखा लक्ष ठेवून होतो. गणा हलवायाने नाटकाला येणे हे नाटकाच्या दृष्टीने धोक्याचे होते. शिवाय पोलीसात दिलेल्या वर्दीने आम्ही—विशेषत: मी मुद्देमालासकट सगळ्या गावासमक्ष सापडणार होतो. बावल्याची साक्ष केव्हा उलटी पडेल हे सांगता येत नव्हते.

हे नाटक जीवाशी खेळणारे ठरले होते. बावल्याने माझ्यावर भलताच सूड उगवला होता. खऱ्या प्रल्हादासारखा मी नाटक सुरू होण्याआधीच 'नारायण' 'नारायण' धावा चालविला होता. सुदैवाने गणा हलवाई अजून दिसला नव्हता.

एकदाचे नाटक सुरू झाले. बावल्या रंगमंचावर येताच गावकऱ्यांनी टाळ्या मारल्या. बावल्यानेही चक्क दोन्ही बोटं तोंडात घालून गाव जागं करणारी शीळ घातली आणि प्रेक्षकांना पावती दिली. मी कपाळावर हात मारला. बावल्या वराच वेळाने 'प्रल्हादा'कडे वळला. बावल्याचे हे तंत्र ध्यानी घेऊन मी मुळातच रंगमंचावर दोन खांबांची योजना केली होती. एका खांबाआड बावल्याची वाक्ये त्याच्या कानापर्यंत फेकणाऱ्या पोराला पुस्तक देऊन उभे केले होते. आणि दुसऱ्या खांबाआड प्रत्यक्ष नरसिंहाच्या भूमिकेत हेडमास्तर तांबूल चघळीत उभे होते. बावल्याच्या उत्साहामुळे त्याचे खांब चुकू लागले. कोणत्या खांबातून आपल्यासाठी आवाज येतोय् हे पाठांतर नसलेल्या बावल्याला कळेनासे झाले.

नाटक एकदाचे सुरू होऊन रंगत गेले. तिसरा अंक सुरू झाला आणि विंगेत माझ्या घशाला कोरड पडली. जीभ आत आत होऊ लागली. तळव्यांना घाम फुटला. मानेखालून धारा सुरू झाल्या. आणि कढईचा सीन आला.

दोन काटकुळ्या राक्षसांनी हिरण्यकश्यपूची आज्ञा होताच ती प्रचंड कढई प्रल्हाद ऊर्फ बावल्यापुढे आदळली. बावल्या किंचित् दचकला. प्रकाशाची तिरीप पंजाने अडवीत त्याने प्रेक्षकांत पाहून घेतले. लागलीच तीत उकळते तेल प्रत्यक्ष ओतण्यात आले. बावल्याला साखळदंडानी खेचून कढईसमोर उभे करण्यात आले. हादरलेला बावल्या आता खरंच मनापासून धावा करू लागला. बायकात कुजबुज सुरू झाले. लहान पोरे किंचाळू लागली. प्रेक्षकांच्या नजरा भयभीत झाल्या आणि अंगावर रोमांच उभे करणाऱ्या प्रसंगी माझ्याही अंगावर काटे उभे राहिले. कारण—

उघडाबंब गणा हलवाई धोतराचा सोगा खांद्यावर टाकून प्रेक्षकांना तुडवीत सरळ रंगमंचाच्या दिशेने येत होता. बावल्याने डोळे गच्च मिटून धरले. त्याच्या या अभिनयाला प्रेक्षकांनी पसंतीची टाळी दिली. गणा पुढे पुढे घोंघावत येत होता. मी सर्वांगावर ओलाचिंब झालो. आता खरे नाटक रंगणार होते. पहाता पहाता गणाने रंगमंचावर उडी घेतली आणि प्रेक्षकांकडे तोंड करीत जोरात बोंब ठोकली, "आयला ऽ, अरं, कढई माझी !"

झाले. प्रेक्षकात गोंधळ सुरू झाला. हा नाटकातलाच भाग असावा म्हणून पोरांनी टाळ्या दिल्या. आता कढईसकट माझी अब्रू गावापुढे यायला काही क्षणांचाच अवकाश होता. बावल्याने बापाला पाहून जागच्या जागी एक उंच उडी घेतली आणि तो कपडेपटात पळाला.

आणि मी विंगेतून गणाच्याच आवेशात रंगमंचावर उडी घेतली. खांब थरथरले. गणा माझ्याकडे मारक्या रेड्यासारखा पाहू लागला. मी गोंधळलेल्या हिरण्यकश्यपूच्या पार्श्वभागी लाथ घालून आत पिटाळले. प्रेक्षकांनी टाळ्यांचा कडकडाट केला. गणाशी झुंज घेणे मला केवळ अशक्य होते. तेव्हा हिरण्यकश्यपूचे विकट हास्य करीत मीच हेडमास्तरांच्या खांबावर अशी सणसणीत लाथ हाणली की तो पोकळ खांब तर पार मोडलाच पण हेडसरांच्या मस्तकापर्यंत लाथ पोचली. त्यांच्या मस्तकाला झिणझिण्या आल्या. त्यामुळे ठरल्यापेक्षा अधिक थयथयाट करीत, उड्या मारीत ते बाहेर आले. मोठमोठ्याने गुरकावू लागले. सिंहगर्जना काढू लागले. आणि हेडसर एकाही तालमीला हजर न राहिल्याबद्दल मला फार धन्य वाटले. कारण समोर कढईशी झोंबी घेणाऱ्या गणा हलवायालाच प्रल्हादाचा










दुष्ट वाप समजून त्यांनी उडी घेतली. गणाला त्यांनी धरणीवर लोळविला. वाघनखांनी त्याची मानगूट धरली. उघडा-वंब वेसावध राक्षसासारखा गणा घाय-कुतीला आला. तो धाडकन् पुन्हा जमिनी-वर कोसळणार तोच हेडसरांनी त्याला आपल्या मांडीवर खेतले. नरसिंहासारखा त्याचा कोथळा काढण्यासाठी त्यांची झटापट सुरू झाली.

इकडे दरम्यान मी वावल्याची मान-गूट पकडून त्याला आधी प्रल्हादाच्या भूमिकेतून बाहेर खेचले. प्रत्यक्ष राक्षसा-सारख्या बापाला मास्तरांच्या मांडीवर पाहून स्वतःला खरंच 'प्रल्हाद' असल्या-सारखं बावल्याला भासलं. तो प्रेक्षकां-सारखीच ती प्रेक्षणीय झटापट पाहू लागला. यावर संतापाने मी त्याच्या. पेकाटात लाथ हाणली.

"वावल्या, आधी ती कढई उचल. आणि पंचनामा व्हायच्या आत पळ वघू घराला." यावर वावल्या पाठ चोळीत म्हणाला,

"सर, पण त्यातल्या तेलाचं काय करायचं?" या त्याच्या जातिवंत प्रश्नाला माझ्याजवळ काय उत्तर असायचे? म्हणालो, "बावल्या, तेलाचं काय आता?

सकाळी भज्यांना होईल ते. आधी उठ पळ."

"पण सर, नाटक राहीलंय् ना—"

"आता आटोपलंच जवळ जवळ. आता काय व्हायलंय्. पाहीलं नाहीस, नरसिंह बाहेर आले आहेत आणि प्रल्हादाच्या वापाची आतडी बाहेर काढण्यात गर्क आहेत ते. आता तुझं काम संपलं. म्हणजे कढई पोचवायचं राहीलंय्."

"पण सर—"

"बावल्या, वेळ करू नकोस. हेडसर आता रंगात आले आहे. ते आता गणाला सोडणार नाहीत. तू कढई पोचवशील-तो-वर गणा चांगलाच बुकलून निघेल. तोवर मी त्याच्याकडून वदवून घेतो. माझा कुणावर आळ नाही. माझी काही तक्रार नाही असं! काय?"

यावर बावल्याचा चेहरा उजळला. त्यानं कढई डोक्यावर धरली. पळता पळता पुन्हा माघारी आला. आठवल्या-सारखं करीत म्हणाला,

"सर, पण पुढच्या नाटकात काम देणार ना?" बावल्याच्या धसक्यानं नाटकाच्या वाटेला आता या गावात जाणे शक्य होते का? तरीही मी जोरात ओरडलो, "वा! बावल्या, अरे तुझ्याशिवाय नाटक शक्य आहे का? अं? पळ आत्ता!!

इकडे हेडमास्तर सिंहासारखे गुरका-वत मांडीवरच्या हिरण्यकश्यपूला नखांनी नुसते ओरवाडीत होते. गणाच्या तोंडातून शब्द वाहेर पडू शकला नव्हता. तो रडा-यला येत नव्हते म्हणून नखांनी वेजार होऊन हसत होता. त्याच्या ओठांच्या कडां-तून फेस ओघळू लागला. हेडमास्तरांना त्याला सांगायचे होते.

' मास्तर, माझी तेवढी कढई होऽ

यावर नरसिंहरूपी हेडमास्तरांनी गगनभेदी डरकाळी फोडली. प्रेक्षकांनी डरकाळीला प्रचंड टाळी दिली. टाळी मिळते हे पाहून हेडमास्तर डरकाळ्या फोडीत राहीले. या गोंगाटात मांडीवरच्या गणाचे शब्द त्यांच्या कानापर्यंत पोचूच शकत नव्हते. त्यांना फक्त प्रल्हादाला वाचवायचे होते.

हेडमास्तरांच्या मांडीवर बावल्याचा वाप वाघनखांनी हसून हसून रडायला टेकला होता. मला पहाताच तो त्यांच्या मांडीवरूनच माझे पाय धरीत सांगायचा प्रयत्न करू लागला, "मास्तर, तुम्ही तरी सोडवा मला, अहो, यापेक्षा नुसता सिंह परवडला मास्तर! आत्ता कसचा जिवंत सुटतो मी...

"थांव गणा. थोडं थांब" म्हणून मी वावल्याच्या वाटेकडे डोळे धरले. त्याची आर्जवं सुरू होती..."

"मास्तऽर! अहो पोटात कळा आल्या. सोडा हो. आयला, वाटल्यास कढई पुन्हा पाठवून देतो....वाटल्यास कायमची ठेवून घ्या, पण मला सोडा..."

कढई पाठवून प्रल्हादाला आणखी छळायचा दुष्ट विचार दिसतो या कल्प-नेनं हेडसरांनी गणाला चांगलेच आव-ळून धरले. त्याच्या पोटावर त्यांनी पुन्हा नव्या उत्साहाने डरकाळी फोडून नखांनी नक्षी काढायला सुरुवात केली. सगळे गाव उभे राहून नाटक पहाण्यात दंग झाले.

बऱ्याच वेळाने मुद्देमाल घरी पोचवून बावल्या आलेला मी पाहिला; आणि हडसून खडसून खात्री करून घेतल्यावरच शेवटच्या अंकाचा पडदा टाकायची खूण केली! ● ● ●




अनुक्रमणिका






यंदाच्या महाविद्यालयीन खेळांच्या महोत्सवातल्या टेबलटेनिसच्या तिहेरी मुकुटाचा मान आपण मिळवायचाच या महत्त्वाकांक्षेनं रणांगणात उतरलेला वासू वैतागून आणि निराश होऊन आपल्या दोन-तीन खास दोस्तांबरोबर महाविद्यालयाच्या उपाहारगृहात बसला होता. समोर चहा निवत होता; पण चहा घे असं त्याच्या मित्रांनाही म्हणवत नव्हतं. चतकोर सफेद चड्डी, टमाटू रंगाचा गंजिफराक, मुळातलं पीळदार शरीर आणि चेहऱ्यावर हवा गेल्याचा भाव. वासू मोठा छान दिसत होता. खाली मान घालून कल्ल्यातून गालावर ओघळणारा घाम हातातल्या जाड खरखरीत पंचाने पुसत तो सुन्न बसला होता. त्याच्या दोस्तांच्या चेहऱ्यावर खंवट हसू होतं. वासूचं स्वप्न भंग पावलं होतं. एकेरी सामन्यात पहिल्याच फेरीत, पुरुषांच्या दुहेरीत शेवटच्या अंतिम फेरीत, आणि मिश्र सामन्यात चतुर्थांश–अंतिम फेरीत तो हरला होता. आता त्याचा आणि नीना प्रधानचा एकत्र घेतलेला फोटो महाविद्यालयाच्या वार्षिकात कसा येणार ? आपला दोघांचा वार्षिकात फोटो येणार नाही याचं वासूला जेवढं वाईट वाटत होतं त्याहीपेक्षा त्याच्या दोस्तांना अधिक वाईट वाटत होतं. तो फोटो वार्षिकात न येण्यामुळे वासूनं त्यांना मान्य केलेली मेजवानी आपोआपच रद्द झाली होती. शिवाय सामने चालू असताना त्यांनी वासूला उत्साहित करण्यासाठी स्वतःचे घसे खरवडले होते त्याचं काय ? वासूच्या दुःखात थोडंफार सहभागी होणं त्यांना मानवणारं होतं; तथापि त्यांच्यापैकी एकजण म्हणालाच, "वासू, आपण ऽडीदवडा, मसालावडा आणि बटाटावडा एकत्र मागवून 'तिहेरी वडा' साजरा करू या." हे वाक्य ऐकून आधीच वैतागलेल्या वासूचा तिळपापड झाला.

त्याचं नुसतं स्वप्नच भंग पावलं नव्हतं तर कल्पनेत रचलेला किल्ला बुरजाबुरजानं ढासळून पडला होता. . या महाविद्यालयातले सामने संपले की, आंतर-महाविद्यालयीन सामने. मग विद्यापीठीय प्राविण्यपद. नंतर आंतर विद्यापीठीय सामने, त्यात पुन्हा प्राविण्य आणि मग भारताचा प्रतिनिधी म्हणून परदेशी दौरा. तिथे अजिंक्यपद म्हणजे जागतिक अजिंक्य पद. मग फोटो, मुलाखती, कदाचित् अब्बास अलिबेगचं हजारो प्रेक्षकांच्या देखत चुंबन घेणाऱ्या मुलीसारखी आषक मुलगी. तीही परदेशातली. हे तर किरकोळ झालं. पण मुख्य म्हणजे महाविद्यालय-सुंदरी कु. तितीक्षा हिचं प्रेम संपादन करण्याचा त्यानं खाजगीत विडा उचलला होता आता तर सगळंच ओंफस झालं होतं. टेबलटेनिसच्या चेंडूप्रमाणे चंचल असलेल्या मनाच्या तितीक्षेबद्दल वासूनं आशा सोडली. आता प्रतीक्षा पाहण्यातही अर्थ नव्हता.

इतक्यात कु. तितीक्षा आपल्या निवडक मैत्रिणींसह (सगळ्या दिसायला सुमारच होत्या. एक शंका—महाविद्यालय–सुंदरीच्या सर्व मैत्रिणी दिसायला सुमार कां असाव्यात ? ) वासू आणि मंडळी ज्या मेजाभोवती बसली होती

ह्याच्या पलिकडच्या मेजावर येऊन बसली. क्षणभर दोन्ही मेजांवर शांतता होती. पण नंतर कु. तितीक्षा आणि मैत्रिणी-मंडळ तोंडावर आपापले टिचके रुमाल ठेवून हसू लागलं. वासूला ते लागलं. त्याला त्या टिचक्या रुमालांचा राग आला. अरे हसायचं तर मोकळेपणानं हसा. तोंडा-वर रुमाल ठेवून हसूही दाबायचं आणि हसण्याचाही प्रयत्न करायचा याला काय अर्थ आहे ? मागे त्याला याच टिचक्या रुमालानं दगा दिला होता. महाविद्या-लयाच्या आवारात त्याला पांढरट-पिव-ळट आणि ज्यावर घरी तारेवर वाळत घातल्याची रेघ होती असा एक टिचका रुमाल सापडला होता. आता इतका साधा रुमाल वापरणारी मुलगी ही जाड चष्मा घालणारी, खप्पड चेहऱ्याची, लुकडी, नेहमी वाचनालयात आढळणारी कु. सुमन नामजोशीच असणार असा सरळ हिशोब मनाशी बांधून वासूनं तो रुमाल तिला वाचनालयात नेऊन दिला होता. पण दुसऱ्याच दिवशी, श्री. वासुदेव अष्टपुत्रे यांनी रु. दहा दंड त्वरित भरावा अशी सूचना महाविद्यालयाच्या फलकावर लागली होती. तेव्हापासून टिचका रुमाल हा वासूच्या तिडिकेचा विषय झाला होता.

.तर त्या हसतच बसल्या. मग त्यातली एकजण म्हणाली, 'तिती, आज एका माणसाची फार फजिती झाली बाई. सगळे चॉप्स नेटात. सगळे शॉट्स टेबला-बाहेर आणि 'लूप्स' टेबलाखाली. खरो-खरच शत्रूवरदेखील येऊ नये असा प्रसंग आला हो बाई त्या माणसावर. बरं ते सुद्धा कुणाशी खेळताना ? कालच कॉलेजात आलेल्या प्रथम वर्षाच्या मुलाबरोबर. निनी मात्र यंदा फॉर्मात आहे. मिक्स डबल्सचं तिचं प्राइज उगाचच हुकलं ! लेडीज सिंगल्स आणि डबल्सची चँपियन-शिप तिला नक्की आहे." त्या बोलण्या-तला तिरकेपणा वासूला समजत होता. पण करणार काय ? मेजावरची बॅट उच-लून स्वतःच्या पार्श्वभागावर खाडकन्

---

उत्तम पार्श्वसंगीत ऐकायचं आहे — वासू अष्टपुत्रेकडे जा ! — वासू नाटकात ए-वन भूमिका करतो — समयोचित व्याख्यानासाठी वासूला बोलवा रवा हवा आहे — वासूचं नाव सांगा — जिकडे तिकडे वासूचंच नाव ऐकून पोतदार वैतागले आणि शेवटी........

---

मारून तो मित्रांना म्हणाला, "चला" ते निघून गेले. कु. तितीक्षा आणि मैत्रिणी मंडळ त्यांच्या दिशेने पाहात खो खो हसत होतं.

संध्याकाळी वासू महाविद्यालयाकडे जाणाऱ्या-येणाऱ्या गाड्यांच्या थांब्या-जवळच्या इनायत कॉफीगृहात एकटाच सुन्न बसला होता. सकाळपासून तो पार ढासळलेल्या मनःस्थितीत होता. कुणाशीही त्याला बोलावंसं वाटत नव्हतं. म्हणूनच त्यातल्या त्यात दूर असलेल्या इनायत-मध्ये तो येऊन बसला होता. कॉफीगृहा-समोरच्या मोकळ्या जागेतल्या एका मोठ्या झाडाखाली त्याचं मेज होतं. बोटात कडक चारमिनार जळत होती.

"माफ करा हं." या मधुर आवाजानं तो भानावर आला आणि त्यानं वर पाहिलं.

## ग. का. भडकमकर

त्याच्या महाविद्यालयात प्रथमवर्ष कला-विभागात शिकणारी हसऱ्या चेहऱ्याची, कु. निशा पोतदार त्याच्या मेजाजवळ आपल्या एका मैत्रिणीसह उभी होती. "अं माफ करा हं ! सकाळी तुम्ही छान खेळलात. तुमचा बॅकहँड फारच पॉवरफुल होता. मला आवडला तुमचा गेम. पण तुमचं लकच् तुमच्याविरुद्ध होतं त्याला तुम्ही तरी काय करणार ? नाहीतर त्या ज्युनियर खेळाडूकडून तुमचा पराभव व्हायचं काहीच कारण नव्हतं. जाऊ द्या. आता दुसऱ्या टूर्नामेंटस्‌मध्ये याचा वचपा भरून काढा. हार्टफेल्ट कन्सोलेशन्स हं ! अच्छाऽऽऽ !" निशा निघून गेली. वासूला किती बरं वाटलं. दोनदोन तीनतीन वर्षां-पूर्वीचे आपले मित्र. पण 'तिहेरी वडा' साजरा करायला निघाले ते ! पण ह्या निशा पोतदारला मात्र आपल्या परा-भवाचं खरोखरच वाईट वाटलं. किती कळवळून बोलली ती. नाहीतर आपली भागीदार नीना प्रधान ! जणू काय मिश्र दुहेरीचं प्राविण्यपद माझ्यामुळेच गेलं असं तिला वाटलं. पण ती तरी काय खेळली ? दिवे ओवाळा. चुकीच्या भागात सर्व्हिस करत होती. परत करताना चेंडूला उंचावा देत होती आणि स्वतःच्या जागेवर पाण्यात डुंबणाऱ्या म्हशीप्रमाणे ढिम्म उभी राहात होती. त्यामुळे पलिकडून येणाऱ्या फटक्याला ही मधेच उभी असल्यामुळे मला प्रतिफटका मारता येत नव्हता. एवढं होऊन देखील तोरा केवढा ? सामना 'संपल्या'वर साधं हस्तांदोलन करण्या-चंही तिनं मुद्दाम टाळलं तर ती सांत्वन कुठली करणार ? ही निशा पोतदार. हिला मात्र खरंच वाईट वाटलं. बस्स ! ठरलं. पुढच्या वेळी हिलाच आपली भागी-दार म्हणून घ्यायचं ! उत्साहित होऊन वासूनं कल्पनेतच चेंडूला 'किल्' केलं. पण निशानंच त्याला मनोमन किल् केलं होतं हे त्याच्या लक्षात यायला थोडासा उशीरच झाला.

वासू म्हणजे हरहुन्नरी प्राणी. एक ना धड भाराभर चिंध्या या प्रकारातला. आणि मुख्य म्हणजे तुटपुंज्या ज्ञानावर कुठल्याही विषयावर गप्पा सहज रंगव-णारा आणि वादावादी करणारा ! तो महा-विद्यालयातच नाही, बाहेरही लोकप्रिय होता. व्हायोलिन वाजवता येत होतं. थोडंफार गायचा. नाटकात कामं करा-यचा. वर्तमान पत्रातल्या 'विनंती विशेष' 'पाचामुखी', 'जनमनाचा कानोसा', 'बहुतांची अंतरे' असल्या सदरातून त्याची अधुनमधून विनंतीवजा, सूचनात्मक











आणि क्वचित् 'संबंधित अधिकारी इकडे लक्ष देतील काय ?' अशा आशयाची पत्रं प्रसिद्ध होत होती. म्हणजेच तो लेखक होता, खेळाडू तर होताच. वक्तृत्वाच्या चढाओढीत भाग घ्यायचा. गावातल्या एका सामाजिक संस्थेतून समाजकार्य करीत होता. एका खाजगी पेढीत उत्तम कारकून होता. असा हा अष्टपैलू वासू ( आडनावही अष्टपुत्रे ) लोकप्रिय नसता तरच नवल !

अशा ह्या वासूची आणि निशा पोतदारची जोडी महाविद्यालयात लवकरच दिसू लागली. टेबलटेनिसच्या दिवाणखान्यात वासू आणि निशा तासन्तास सराव करू लागले. महाविद्यालयाबाहेरच्या क्रीडामंदिरात ते मेज राखून ठेवू लागले. टेबलटेनिसच्या खेळाबरोबरच वासू निशाला अभ्यासातही मदत करीत होता. व्हायचं तेच झालं. वासू निशाच्या प्रेमात पडला. तीही आपल्या प्रेमात पडली आहे हे वासूनं केव्हाच जाणलं होतं.

निशापुढे वासूला तितीक्षा आणि नीना प्रधान आणि तमाम मुली खोट्या वाटू लागल्या. निशा सर्वांपेक्षा चुणचुणीत आहे असं वासूचं मत झालं. निशा तितीक्षेइतकी गोरी गोरी–पान सुंदर नव्हती आणि नीना प्रधानसारखी उत्तम स्वास्थ्याची नव्हती; पण सावळा रंगच छान वाटतो आणि तरुण मुलगी सडपातळच असावी असं वासूनं स्पष्ट आणि प्रामाणिक मत बनवून टाकलं. प्रेमसाफल्याच्या तयारीला लागण्याचं वासूनं निश्चित केलं.



निशाचा बाप कुठल्यातरी राज्य-सरकारी नोकरीत सरहिशेबनीस होता. आपल्या प्रीतीपात्राचा बाप भुक्कड सरकारी त्यांतून राज्य सरकारी नोकरीत असावा असं वासूला वाईट तर वाटलंच पण तो प्राणी कशा स्वभावाचा असावा याचा वासूनं धसका घेतला. त्याला वासूच्या अष्टपैलूंपैकी एकही पैलूबद्दल आकर्षण आणि स्वास्थ्य वाढण्याची सुतराम् शक्यता नव्हती. त्यातून तो सरहिशोबनीस; म्हणजे हिशोब जुळणं कठीणच होतं.

निशाच्याच वाड्यात राहाणाऱ्या अप्पा वढावकर या वासूच्या ओळखीच्या गृहस्थांतर्फे वासूनं आपला मनोदय निशाच्या बापाच्या–पोतदार–कानावर घालण्याची व्यवस्था केली. पण ते निशाचं शिक्षण बी. ए. पर्यंत होईस्तो तिच्या लग्नाचा विचार करायला तयार नव्हते. वासूसारख्या 'सामान्य' माणसाला त्यांना जावई करून घ्यायची इच्छा नव्हती. तरी बरं त्यांनी वासूला पाहिलं नव्हतंच आणि त्याच्या कार्याचीही त्यांना माहिती नव्हती.

वासूच्या व्हायोलिनची लावतानाच तार तुटली. पण तो निराश झाला नाही. येत्या मोसमात निशाशी लग्न लावण्याचा वासूचा निर्धार होता. काहीतरी करणं भाग होतं. वासूला युक्ती सुचत होती.

☆ ☆

रविवारी सकाळी निशाच्या घराच्या दारावर टकटक झाली. निशानं दार उघडलं. दारावर टकटक् करणाऱ्या त्या गृहस्थानी निशाला, तिचे वडील घरात आहेत का म्हणून विचारलं. "बाबा तुमच्याकडे कुणीतरी आलंय् " असं म्हणून निशा आपला केशसंभार सावरीत न्हाणीघराकडे पळाली. तिच्याकडे पाहून त्या गृहस्थांनी मनातल्या मनात संतोष व्यक्त केला.

"नमस्काऽऽऽर" या घोगऱ्या खर्जातल्या आवाजाच्या दिशेनं त्या आलेल्या गृहस्थानी पाहिलं, नमस्कार म्हणणाऱ्या त्या भयानक चेहऱ्याकडे पाहून त्या गृहस्थाची बोबडीशी [illegible] झाली. पण





स्वतःला सावरून त्यांनी प्रति-नमस्कार केला. "वसा" पोतदार म्हणाले.

"मी बाळासाहेब कोटिवुद्धे" ते गृहस्थ म्हणाले, इथल्या साठे विद्यालयाचा मुख्याध्यापक. आज संध्याकाळी आमच्या विद्यालयात माजी विद्यार्थ्यांचं स्नेहसंमेलन आहे. आमच्या मुलींच्या शाखेत आपली निशा शिकत होती म्हणून मुद्दाम आपल्याला निमंत्रण द्यायला आलोय्. थोडासा उशीर झाला तरी हरकत नाही पण नाटक चुकवू नका. निदान दुसरा अंक. या अंकात एक खून पडतो. त्यावेळचं पार्श्वसंगीत तुम्ही विसरू शकणार नाही. अंगावर काटा उभा राहील तुमच्या. हे पार्श्वसंगीत व्हायोलिनवर आमचा होनहार माजी विद्यार्थी वासुदेव अष्टपुत्रे यानं दिल आहे. त्याचं व्हायोलिन ऐकताना डोळे मिटन घ्या. प्रत्यक्ष गजाननराव जोशी, व्ही. जी. जोग व्हायोलिन वाजवताहेत असं वाटतं. बाकी तुम्ही अनुभव घ्यालच. वराय् चलतो मी. संध्याकाळी या. लक्षात ठेवा; नाटक. त्यातून दुसरा अंक. खून पडतो त्यावेळचं वासुदेव अष्टपुत्रेचं व्हायोलिनवरचं पार्श्वसंगीत"

.बाळासाहेब निघून गेल. पोतदार विचार करीत होते—कोण तो ? वासुदेव अष्टपुत्रे ? व्हायोलिन वाजवतो ? टीक आहे.

दुपारी निशाच्या घराच्या दारावर टकटक झाली. त्यावेळी निशाच्या आईनं दार उघडल. आगतानं निशाच्या वडलांची चौकशी केली. तेव्हा "आपल्याकडे कुणी आलंय्" असं म्हणून निशाच्या त्या माऊलीनं सरकारी शिध्यात मिळालेले तांदूळ निवडायला घेतले.

"आमचं नाव वाबुराव" त्या आगतानं आपली मान किंचित् मागे टाकून, माथ्यापासून मानेपर्यंत हात फिरवीत म्हटलं, "सामंत, आमचं नाव वाबुराव सामंत. आमची इथे एक नाटच-खंक नावाची संस्था आहे. प्रतिवर्षी आम्ही दोन—तीन नाटकं नाटयरसिकांच्या सेवेशी रुजू करीत असतो. त्यातली काही नाटकं दिग्दर्शित करण्याची संधी आम्हाला मिळाली आणि रसिकांनी, जाणकारांनी, टीकाकारांनी, साहित्यिकांनी, मान्यवंतांनी आमची सेवा सहर्ष, सानंद, उदार मनानं, विशाल अंतःकरणानं मान्य करून घेतली बात आमच्या सेवेचं चीज झालं असं आम्ही समजतो. आणि अशीच नाटयसेवा आमच्याकडून रंगदेवतेच्या कृपेनं यापुढेही घडत राहील याबाबत आम्हाला बिलकुल संदेह वाटत नाही, असं जर विधान करण्याचं धाष्टर्य आम्ही केलं तर ते अस्थानी आणि अवास्तव होईल असं वाटत नाही" एवढं बोलून वाबुराव सामंतांनी पोतदारांकडे अपेक्षेनं पाहिलं. त्यांना काही उमगल्याचं दिसत नव्हतं. "अस्तु वाबुरावांनी सुरुवात केली, "तत्राप उदईक आम्ही नाटयरसिकांना सादर करू धजणाऱ्या 'चार त्रिक तेरा' नामक फार्सिकल नाटयप्रयोगाला आपण जातीनं उपस्थित व्हावं अशी मनीषा मनी प्राप्त झाल्यामुळे आपल्या सदनी येण्याचं करावं लागलं. नाटच—खंकचे एक कलावंत श्री. वासुदेव अष्टपुत्रे यांचा उपरिनिर्दिष्ट

नाटकात वाटा आहे. त्यांनी नाटकात कमाल करून सोडली आहे. त्यांचा तो अभिजात अभिनय, सफाईदार हालचाली, धीरगंभीर आवाज, आवाजाची उत्कृष्ट फेक, वेधक मुद्राभिनय, भेदक डोळे, काय सांगू आपल्याला? हा नाटचप्रयोग आपण अवश्यकरून अवलोकन करावा म्हणून आपणास निमंत्रण देत आहोत. अस्तु. निघतो आम्ही. ध्यानी असू द्या. वासुदेव अष्टपुत्रे. अभिजात अभिनय .वगैरे वगैरे. बाबुराव निघून गेले. "कोण?" पोतदार विचार करीत होते. " वासुदेव अष्टपुत्रे? म्हणजे सकाळचा व्हायोलिनवालाच का?"

"निशेऽऽऽ" बापानं हाक मारली. ती वेण्यांशी चाळा करीत आली. "कोण ग हा वासुदेव अष्टपुत्रे?" निशा चपापली. पण धीरानं म्हणाली, "अय्या, बाबा तुम्हाला माहीत नाही. आमच्या कॉलेजात आहेत. टेबलटेनिसच्या मिक्स डबल्सला मला पार्टनर म्हणून घेणार आहेत."

" अस्सं अस्सं" असं रुक्षपणानं म्हणून त्यांनी तो विषय तियेच थांबवला.

नंतरच्या आठवडचातल्या एका आडवारच्या सुटीच्या दिवशी निशाच्या घराच्या दारावर टकटक् झाली. पोतदार दार उघडायला उठले. त्यांना मुनातून राग आला होता. सुट्टीच्या दिवशी काय हा त्रास अशा आशयाची मुद्रा करीत त्यांनी दार उघडलं आणि समोर मध्यम वयाची चष्मिष्टर बाई पाहून त्यांनी "अहो पहा तुमच्याकडे कोण आलंय" असं स्वतःच्या मंडळींना उद्देशून, आलेल्या बाईकडे पाठ फिरवली. बाई म्हणाल्या,"माफ करा. मी आपल्याकडेच आले आहे. माझं नाव सिंधू मार्गवे. मी इथे एक बालकमंदिर चालवते. आज शिशु–दिनानिमित्त लहान मुलांचे कार्यक्रम आहेत. मुख्य पाहुणे वासुदेव अष्टपुत्रे यांना बोलावलं आहे." पोतदार चमकले. "आपल्याला माहीत असेलच " बाई पुढे बोलू लागल्या, " की वासुदेव अष्टपुत्रे हे एक प्रतिथयश लेखक आहेत. त्यांचं एकच पत्र महिनोन् महिने वेगवेगळचा वर्तमानपत्रातून येत असतं. इथल्या अशुद्ध पाणी पुरवठयाबाबत त्यांनी लिहिलेलं पत्र अक्षरशः अक्षर वाङमयात जमा व्हायला काहीच हरकत नाही. साहित्याकरता देण्यात येणाऱ्या पारितोषिकांच्या बाबतीत सरकार पक्षपाती आहे असं मला वाटतं. नाहीतर अष्टपुत्र्यांऐवजी पु. ल.,रणजित देसाई, यांनी बक्षिसच मिळती ना ! असो. वासुदेव अष्टपुत्र्यांच्या साहित्याचं मूल्य काळच ठरवील. असो. तर आज संध्याकाळी आपण जरूर या. आपल्या शेजारचा रमेश आमच्या मंदिरात आहे म्हणून आपल्याला मुद्दाम सांगायला आले आहे. वासुदेव अष्टपुत्र्यांचं प्रभावी भाषण आपल्याला ऐकायला मिळणार हे खरोखर भाग्यचंच आहे. बराय्. निघते मी. जरूर या." मार्गवे बाईंनी 'बे' धरला आणि पोतदारांची सुटका झाली. 'अरेच्या, पुन्हा वासुदेव अष्टपुत्रे. अरे काय प्रकार काय आहे हा? आणि प्रत्येकजण नेमका माझ्याकडेच कसा येतो? पोतदार मनात म्हणाले.

संध्याकाळी बालक मंदिरातल्या बाल-लीला आणि वासुदेव अष्टपुत्रे नामक प्राण्याचं पोरकट भाषण आणि हावभाव पाहून, आता दणकून जेवायचं असा विचार करून पोतदार पाटावर बसले तेवढचात दारावर टकटक झाली. आगताला दारा-


STATEMENT ABOUT OWNERSHIP AND OTHER PARTICULARS ABOUT NEWSPAPER " DIPAVALI " MONTHLY

FORM IV (SEE RULE 8)

| | | |
|---|---|---|
| 1. | Place of Publication | Dalal Art Studio. 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 2. | Periodicity | Monthly, on 1st of every month. |
| 3. | Printer's Name | Shri Dinanath Damodar Dalal. |
| | Nationality | Indian. |
| | Address .. | 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 4. | Publisher's Name, Nationality and Address | As per 3 above. |
| 5. | Editor's Name, Nationality and Address | As per 3 above. |
| 6. | Names and addresses of individuals who own the newspaper and partners or shareholders more than one percent of the total capital. | Shri Dinanath D. Dalal, Sole proprietor. No partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

Date 1-3-1969

**D. D. Dalal**
Signature of Publisher









तूनच परत वाटेला लावावं म्हणून स्वतःच त्यांनी दार उघडलं आणि आणि अत्तराच्या घमघमाटानं त्यांचं नाक भरलं. "आदावत है जनाब, आदावत है" त्या आगतानं त्यांना यवनी जबानीत सलामी दिली. हल्ली आपल्याकडे नवनवीन प्राणी जे यायला लागले आहेत तें, राणीची बाग उध्वस्त करून पळून आले आहेत की काय अशी शंका त्यांच्या मनात येण्यापूर्वीच तो आगत घरात प्रविष्ट झाला. झुपकेदार काळ्या कुळकुळीत मिशा, कपाळावर गंध, रेशमी झब्बा, रेशमी टोपी, चुणीदार सुरवार गळ्यात सोन्याची साखळी, पायात मोजडी. काळं सावळं पण मोठं रुबाबदार व्यक्तिमत्व होतं त्या आगताचं. "आम्ही रामप्रसाद जिलबीवाले" त्या आगतानं परिचयाचा प्रस्ताव मांडला, "आमचं लॉज आहे इथं ! पण गाण्याचा शौक भारी. पूर्वी औरंगाबाद केंद्रावर गात होतो. हल्ली बंद केलंय्. धंदा आहे ना ! दर गुरुवारी आमच्या लॉजवर गाण्याचा सार्वजनिक रियाझ असतो. आमची दोस्त मंडळीही येत असतात. आपल्याला गाण्याचा शौक आहे असं ऐकलं आणि आपल्याला निमंत्रण द्यायला आलो. ( आपल्याला गाण्याचा शौक आहे अशी बातमी या सद्‌गृहस्थाला कुणी दिली याचा विचार पोतदार करीत होते. निदान आपल्या चेहरेपट्टीवरून तरी, आपल्याला गाण्याचा शौक नाही याची त्याला खात्री पटायला हवी होती.) जरूर यायचं आपण. येत्या गुरुवारी बडा मझा येणाराय्. आमची ग्वालियरकडची काही मंडळी यायचीत्. आम्हीही ज़रेकस गाणार आहोत. तंबोऱ्यावर वासुदेव अष्टपुत्रे आहे." (पोतदारांची पोटातली भूक मस्तकात भिनली ). रामप्रसादजी बोलतच होते. "लडका बडी अच्छी साथ करता हैं. गलेसे सहीसही तान निकालता है. परवा इथे भीमसेन आणि कुमारचं गाणं झालं. तंबोऱ्यावर वासुदेव अष्टपुत्रेही था. कुमार मला म्हणाला, 'लडका क्या साथ करता है ! खरं म्हणजे हा तानसेनच्या तोडीचा गायकच व्हायचा. पण खैर. हरकत नाही. हम उसको मानते हैं." असायू हा वासुदेव अष्टपुत्रे. अच्छा. हम चलते है. जरूर आइयेगा. गुरुवार भूलना मत. तंबोऱ्यावर वासुदेव अष्टपुत्रे."

"वासुदेव अष्टपुत्रे ! वासुदेव अष्टपुत्रे !! वासुदेव अष्टपुत्रे !!!" पोतदार संतापानं फुलत होते. ' कोण आहे हा ? प्रत्येकजण याचं महत्त्व माझ्याजवळ कां गातोय ? जाऊ द्या. आपण जेवावं झालं. पोतदार पानावर जाऊन बसले आणि पंधरवड्याचा सगळ्या कुटुंबाचा शिधा खलास झाला.

अपचनानं पडलेल्या स्वप्नात पोतदारांच्या डोळ्यापुढे बाळासाहेब कोटिबुद्धे, बाबुराव सामंत, सिंधू मार्गवे आणि रामप्रसादजी जिलबीवाले फेर धरून नाचत होते.

नंतरच्या रविवारी पोतदार सकाळीच बाजारात निघून गेले. निदान साडेबारा एकपर्यंत तरी घरी परतायचं नाही असा निर्धार करून ते बाजारात हिंडत होते. तेवढ्यात एका अनोळखी गृहस्थानं त्यांना नमस्कार करून विचारलं, "आपणच पोतदार ना ?" आणि पोतदार काही बोलणार तेवढ्यात त्या गृहस्थानं स्वतःची ओळख करून दिली. "मी नाना दातार. वैद्यकी करीत असतो. शिवाय आमची स्वतःचीही काही औषधं आहेत" ( आता या माहितीची आपल्याला काहीच आवश्यकता नव्हती अशा मुद्रेने पोतदार त्या लठ्ठदेही, पान चघळणाऱ्या, स्वच्छ कपड्यांवर चौकटीचा तपकिरी रंगाचा कोट घातलेल्या दातारांकडे पहातच राहिले ) "आपल्याला मुलाच्या मुंजीकरता रवा हवा आहे असं कळलं म्हणून मुद्दाम सांगायला आलो. ( पोतदारांचा चेहरा जरा उजळला. ) आपण खरेदीविक्री संघात जा. कार्ड असणाऱ्यांनाच तिथे शंभर ग्रॅम रवा मिळतो. पण आपण वासुदेव अष्टपुत्र्यांचं नांव सांगा पोतंभर रवा घरपोच मिळेल." "जे टाळण्यासाठी पोतदार घराबाहेर पडले होते नेमकं तेच नाना दातार म्हणून त्यांच्यापुढे हजर झाले होते. संतापून ते दातारांना काही म्हणणार तेवढ्यात, ते गर्दीत मिसळून देखील गेले.

दाणदाण पावलं टाकीत पोतदार घरी आले आणि पाहातात तो कुणी यवन गृहस्थ अगोदरच येऊन बसलेला. निदान हा तरी त्या वासुदेव अष्टपुत्र्याचं नाव

उमा डांगरे

**" कपड्यांवर किती खर्च करतेऽऽस कपड्यांवर किती खर्च करतेऽऽऽस रोज रोज कोण मेलं ऐकून घेईल ! "**

घेणार नाही असं वाटून ते त्याच्याशी बोलायला गेले. तो यवन मराठी बोलू लागला, "मी अफजल रझ्झाक. वकील आहे. ( वकील म्हटल्यावर पोतदार जरा वरमले ) आमचं एक मंडळ आहे इथे. त्याच्यातर्फे अनाथ आणि अपंग मुलांच्या मदतीकरता आम्ही एक मुशायऱ्याचा कार्यक्रम करणार आहोत. तिकिटाचे दर कमी आहेत. आपण तिकिटं घ्यावीत म्हणून मी विनंती करायला आलो आहे. आमच्या मंडळाचे एक कार्यकर्ते श्री. वासुदेव अष्टपुत्रे हे तिकिटं देण्या " पोतदारांचं डोकं भणाणून उठलं. ताडकन् उठून ते म्हणाले.–"हे पहा कृपा करून " पुढचं काहीच न सुचल्यामुळे उघडया दाराकडे सटकन् बोट दाखवून पोतदारांनी वकिलसाहेबांना आपली तकलीफ ले जाइये म्हणून सुचवलं.

पुढच्या रविवारी सकाळी निशाच्या घराच्या दारावर टकटक झाली. आणि दार न उघडता पोतदार आतूनच ओरडले, "मला त्या वाश्या अष्टपुत्र्याबद्दल एक चकार शब्दही ऐकायचा नाही. कृपा करून आपण जे कोण असाल ते दारातूनच परत जा." निशा निराश झाली. यावेळी तिनं खुद्द वासूलाच बोलावलं होतं. पण वासू आणि पोतदार यांची भेट झाली नाही. दुपारी पोतदारांना शांत झोप लागली.

संध्याकाळी फिरून पोतदार घरी आले तर कुणीतरी फुल् सुटातला, तुकतुकीत टकलाचा, गुबगुबीत चेहऱ्याचा माणस खुर्चीत वर्तमानपत्र वाचत बसलेला. तो गृहस्थ कोण, कुठला, काम काय याची यत्किंचितही चौकशी न करता पोतदार त्याला म्हणाले, " कृपा करा आणि जर तुम्ही वासुदेव अष्टपुत्रेबद्दल काही सांगणार असाल तर निघून जा." तो गृहस्थ उठला आणि दरवाजात उभा राहून बूट घालता घालता म्हणाला. "हे पहा मि. पोतदार, मी अष्टपुत्र्यांचा बॉस आहे. त्यांना आम्ही सीनियर क्लार्कचं नुकतंच प्रमोशन दिलं आहे. पुढच्या वर्षी ऑफिसर्स ट्रेनिंगकरता त्यांना कानपूरला पाठवणार आहोत."

पोतदारांना वेड लागायची पाळी आली. जिकडे तिकडे वासुदेव अष्टपुत्रे त्यांना दिसायला लागला.

...ते मुक्त होऊन आरामखुर्चीत बसून होते. रात्रीचे दहा वाजून गेले होते. निशा बाहेरून दबकत दबकत आली पण दाराची कडी वाजलीच. पोतदार खुर्चीतल्या खुर्चीत दचकले. अभावितपणे त्यांनी निशाला विचारलं, "तू त्या वाश्या अष्टपुत्र्याकडून आलीस ?"

"होऽऽय" निशानं संयमपणानं सांगितलं. पोतदार गार. "त्यांचं प्रेम आहे, बाबा माझ्यावर. माझ्याशी लग्न करणार आहेत ते. पण तुम्ही माझं अजून चार वर्षं लग्न करायला आणि त्यातून त्यांच्या सारख्या 'सामान्य' माणसाशी लग्न करून द्यायला तयार नसल्याचं त्यांना आपल्या वढावकर काकांडून समजलं. त्यांचं नाव, महत्त्व, असामान्यत्व आणि माझ्याशी लग्न करण्याची तीव्र इच्छा तुमच्यावर ठसवण्याकरता एका मागोमाग एक त्यांच्या चाहत्यांना तुमच्याकडे पाठवलं .माझंही प्रेम आहे त्यांच्यावर. आम्ही लग्न करणार आहोत. फार फार छान आहेत ते.

"पुरे. कळलं. पण कार्टे तुझं शिक्षण?"

"लग्नानंतरही शिक्षण होईल बाबा. थोडंसं सावकाश होईल पण अगदीच आई आणि मुलगा किंवा मुलगी एकदम बी. ए. झाल्या अशी चौकटीतली बातमी पेपरात येऊ देणार नाही मी."

.आणि काय सांगावं ? निशा–वासू यांचं लग्न झालं. पोतदारांनी दुहेरी हिशोब केला. निशाच्या शिक्षणाचा खर्च उगाच कां सोसा ? शिवाय मुलगा 'अगदीच वाईट' नाही. घरी चालत आलेलं स्थळ. पुढच्या वर्षी ऑफिसर होईल. अखेर सरहिशोबनिसांनी ताळेबंद जमवला.

परवा सौ. व श्री. वासुदेव अष्टपुत्रे लोकांना रस्त्याने जाताना दिसले. वासुदेवरावांनी आपल्या आडनावाबरहुकूम एक-अष्टमांश कार्य पूर्ण करीत आणल्याचं जाणकारांनी ओळखलं.

* * *

## ' कादंबरीके'साठी रौप्य–पदक

'दीपावली 'च्या रौप्य–महोत्सवी वर्षात ( मार्च १९६९ ते फेब्रुवारी १९७० ) 'कादंबरीका ' प्रसिद्ध करण्यात येणार आहेत. त्या एकाच अंकात प्रसिद्ध होणार नाहीत. त्यामुळे या कादंबरीकांपैकी सर्वोत्कृष्ट कादंबरिका कोणती या बाबत वाचकांचे मत वर्षं अखेरीला प्रसिद्ध होणाऱ्या खास 'कूपन' द्वारेच अजमाविण्यात येईल आणि वाचकांनी अग्रमान दिलेल्या 'कादंबरीके'च्या लेखकाला 'रौप्य–पदक' देण्यात येईल.

—संपादक





(पृष्ठ २६ वरून–कादंबरी)

पाहिजेत. तुमी आमच्याकडे बघितलां नाय, तर अमचां पोट कसां भरावां ?"

"लागलं ! परवा केस-दाढी दोन्ही होऊद्यात."

"परवाचां परवा; पण आज जरा टेका तरी. दोन गोष्टी सांगा मुंबईच्या."

"काय सांगणार बाबा ?" म्हणत कुशाभाऊ टेकला.

"तुमच्यां मेवन्याला नेलावतात ना मुंबैला ? कसली नोकरी मिळाली ?"

"कर्म ?"

"असां कां ?"

"एक तर त्याचं शिक्षण कमी. शिवाय हे राजेश्री नोकरी करणार कापड दुकानात."

"मग मुंबैला काय तोटा गेलाय कापड दुकानाना ? आमचा रेडीजशेट फॅन्सी माल आणतो मुंबैहून दर महिन्याला."

"कापडाला काय चाटायचंय ? नोकरीचं बोला."

"काय झालां ?"

"काय होणार ? बोंब !"

"काय म्हणता काय ?"

"रवळनाथाची शपथ ! सगळे कापड दुकानदार एक जात झाडून भट. ते काय वाण्याना नोकरी देणार ? त्यांच्याकडे गोखले, कर्वे, ताम्हणकर नि पटवर्धन—पाचवं नाव नाही !"

"द्या टाळी !" निळूने जागचं उठून टाळी मागितली. ती देत कुशाभाऊ म्हणाला,

"तुमचाही अनुभव हाच ना ?"

"डिट्टो ! भटजी भटजीलाच ओढणार. नि त्याच्या उलट आमचे लोक ! पुढचा मरतोय केव्हा नि पाठचा जाळतोय केव्हा, ह्याशिवाय वात नाय. आमच्या पोलीस लोकात तर भारीच ! राणे साळवीच्या उलट नि साळवी सावंताच्या उलट. आणि राणे नि साळवी मिळून भोसलेच्या उलट!"

"खरां की काय ?" सदूने आश्चर्याने विचारलं.

"जे इथे तेच तिथे."

"इथे काय झालंय ?" कुशाभाऊने कुतूहल व्यक्त केलं.

"त्याचा मोठ्ठा इतिहास हाय."

"ऐकू दे तरी."

"काका बर्वे माहीत हाय ना ?"

"काका कुणाला माहीत नाहीत ? ही वाडी त्यांनी वसवली."

"हेंच आमच्या लोकांचा चुकतां."

"कसं ?"

"काकांनी वसवलीनी म्हणजे काय केलां ? काय आमची घरां उभारलीनी, का आमच्या वावडचा खोदलीनी ? काय केलानी तरी काय ? फक्त पुढारीपण तेवढां केलां !"

"ते अजूनही चाललंय. काल कर्दिले मोहल्ल्यात गेलेवते."

"काय सांगता काय ?"

"रवळनाथाची शपथ ! मला वाटेत भेटलेवते. "म्हटलं, काका कुणीकडे निघालात ?" तर म्हणाले, "मोहल्ल्यात चाललोय." म्हटलं, आज मोहल्ल्यातसे ?" तर म्हणाले, "महंमद मास्तराला सांगतोय की शहाणा असशील तर हिंदूंची घरं परत घ्या असं आम्हाला सांगत ये—त्यात त्याचं कल्याण आहे.

"घे सदू ! ह्याला म्हणतात पाताळयंत्रीपणा."

"आमच्या कानावर नाय पण."

"कसं असेल ? बामणाचं डोकं आहे.

"म्हणजे, माझ्या नाही लक्षात आलं."

"सरळ आहे. मोहल्लेवाल्यांना सल्ला देऊन त्यांच्याकडून भलं म्हणवून घ्यायचं; घरं हिंदूंना द्या सांगून हिंदूंकडून भलं म्हणवून घ्यायचं. आणि वर सर्वांच्या शेंड्या स्वतःच्या हातात ठेवायच्या !"

"भटजी कंपनी खरी डोकेबाज !"

"तरी नशिब, गावात एकच भटजी आहे. चार असते तर एव्हाना त्यांनी आम्हाला विकलं असतं !"

"भटजी कंपनीचा भलताच अनुभव दिसतोय तुम्हाला !"

"सत्यनास केला माझा भटांनी."

"तो कसा काय ?"

"मी पोलीसात होतो.

"होतो म्हणजे ? सध्या नाय की काय ?"



अनुक्रमणिका



"अगुदर ऐकां तर खरां. मी पोलीसात होतो. ड्यूटी होती माझी महालक्ष्मीला. रेसकोर्सवर. तिथे काय लफडा निघाला. इन्क्वायरी झाली. ऑफीसर कोण ? तर भागवत, चिपळूणकर आणि माटे. झालां, तिघांनी मिळून आमचां तारु डुबवलां !"

"कमाल आहे !"

"तुमाला नुसतां ऐकून असां वाटलां, मग माझां काय झालां असेल कल्पना करा !"

"तरी म्हटलं तुम्ही एवढे पोलीसवाले इकडे कसे !"

"इकडे कसे ? शपथ घेऊन आलोय : बामणास पळता भुई थोडी करीन !"

"मग आता काय करणार ?"

"बघालच तुमी."

"तरी पण—"

"सगळा गाव उभा करतो काकावर बहिष्कार टाकायेला."

"पण त्यांनी जायचं कुठे ?"

"धोपेश्वरास जा, नायतर मुंबैस जा. इथे आमच्या गावात काका भटही नको, नि काकू भटीनही नको !"

"आणि गावात लग्नां निघाली मग काय करशाल ?"

"राजापुराची भटाळी काय ओस पडल्याय ? गंगेवर शंभर भट जमा होतायत; फक्त दिडक्या हव्यात !"

निळूने सगळे प्रश्न कसे कापूस पिंजल्यासारखे पिंजून दाखवले. त्यावर कुणालाच काही बोलता येईना. ते गप्प बसले. सदूला दुरून साटम पोस्टमन धोतराचा गोळा अर्ध्या मांडीवर घेऊन येताना दिसला. त्याने हाळी घातली,

"आमचां नावेलकरांचा काय हाय काय ?"

"नाही. आज मंजिनाथ तुळसकर आणि काका बर्वे आहेत. तुम्हाला काय कार्डाविर्डा हवीत ?"

"आमी कोणाला लिणार ?"

"असां आता म्हणतां. नि नसली माझेजवळ की वाकड्या पिंपळापर्यंत माझ्यामागून धावत येतां. तुमच्या गाववाल्यांच्या रीती मी ओळखतो."

"आज नको. कशाला तीन दिडक्या अडकावून ठेवायच्या ?"

"बरं, नको तर नको. मला असं सांग, आज वसू ? नुसता एक हात फिरवायचाय."

"आज नको. उद्या."

"अरे वसूया रे. बोटभर वाढल्याय."

"आणि आणखी हातभर वाढली तरी पोष्टमनाकडे कोण बघतंय ? उद्या वसू."

"माझा वाळ तो—चल, उद्या–उद्या नको करू. आण तुझी हत्यारं."

साटम पोष्टमन सदू नावेलकराच्या गळ्यातच पडला. कुठली झक मारली नि त्याला हाकारला असं सदूला झालं. त्याने वाटी-बस्तरा आणला. गोणपाट टाकलं–आणि काम सुरू केलं. साटमने पडवीतल्या कोनाड्यात ठेवलेल्या पत्रांची पुडी निळूने चाळवायला सुरवात केली. काकांच्या पत्रावरचा शिक्का तो नीट न्याहाळू लागला. त्याला अक्षरं लागेनात. साटमने त्याला वाचून दाखवलं.

"कलकत्ता."

"कलकत्ता ? म्हणजे बंगालमध्ये आहे ना ?"

"आता मला भूगोल विचार !"

"खात्री करून घेतली म्हणजे बरी."

"हो–हो, कलकत्ता बंगालची राजधानी आहे."

"म्हणजे काका भट बंगालपर्यंत पोचला तर !"

"भटजी कंपनीबद्दल काय बोलूच नका ! पाताळातसुद्धा जातील नि आपली कामं करतील."

"हे पत्र मी घेऊन जातो." निळू म्हणाला.

"नाही रे बाबा ! सरकारी माल तो —भलतांच नको लफडां"

"कोणाला कळणाराय ?"

"छे छे – ठेव ती पत्रां. फट् म्हणता ब्रम्हहत्या व्हायची !"

"काय मोठा एका पत्रानं फरक पडायचाय ?"

"तू खाली ठेव ती पत्रां अगुदर. मानेला फास लावशील माझ्या बाबा !"

साटमने उठून पत्राची जुडी निळूच्या हातातून हिसकावून घेतली. आणि ती मांडीखाली घालून तो परत गोणपाटावर बसला.

सदूने विचारलं,

"त्या पत्रांचां तुमी काय करनार ? ज्याचां त्येला गेलेलां बरां."

"कळेल तुम्हाला !"

"तू भलतां लफडां करू नको हां—नाहीतर सांगशील पोष्ट-मनने पत्रां दाखवलान नि मला लावशील नसता घोर !— पोलीसवाले लोक तुम्ही !"

"तुमचा संबंधच काय ?"

"नाही, आपलं सांगून ठवलं."

"पत्र कलकत्त्याहून आलंय. म्हणजे काका कलकत्त्यापर्यंत पोचला हे दिसतंच."

"पोचेना !"

"पोचेना कसां ? वाडीवाल्यांचा उत्पन्न तिकडे पाठवतोय तो. थांबा, आता ह्या भटाचा पुरता बंदोबस्त करतो, तरच नावाचा कॉन्स्टेबल निळू !"

"बाकी, भट माजल्यायत हे खरं हं." कुशाभाऊ म्हणाला.

"दुनियेतले भट झक् मारतात—ह्या काका भटाचा आपुन काटा काढायचा."

"एका भटाचा काटा काढून प्रश्न सुटणार नाही. सर्वांच्या नांग्या मोडाल तर खरे."

"स्मशानात असतील शंभर भूतां. आमाला काय त्यांचा ? आमच्या दारातल्या भुताला गाडणां हे आपलां काम !"

"गाडा बापडे !" कुशाभाऊ हात झटकून मोकळा झाला. मनाशी ठाम निश्चय करून निळूने मिशीला पीळ दिला.

बोलणं साटम पोष्टमनला एकदम पटलं. तो म्हणाला, "जाल तिथे भटांची वरकडी ! आमच्या पोष्टात वरच्या सगळ्या जागा भटांना ! गोरे, जोगळेकर, देवधर; नायतर, साने, गोंधळे-कर, जांभेकर— आमचा एक माणूस वर सरकेल तर हराम !"

"उशीरां का होईना, तुम्ही जागे झालांव !"

"आम्ही केव्हांचेच जागे आहोत !" पोष्टमन ठामपणे म्हणाला नि काका बर्व्यांचं पत्र जुडग्यात आहे की नाही त्याची पुन्हा एकदा खात्री करीत वाटेस लागला.

अनुक्रमणिका

## [१७]

निरोप मिळाल्याबरोबर हातातलं काम टाकून मंजिनाथ काकूंच्या बाजेसमोर हजर झाला. घरात अंधार होता. तशात तिन्हीसांजा झालेल्या. काकूंनी मंजिनाथला सांगितलं,

"मंजि, आता आला आहेस तर अगोदर देवापुढे तेवढं निरांजन लाव पाहू." मंजिनाथ जागचा हलेना. तेव्हा त्यांनी सांगितलं, "आमच्या देवाला चालतं."

मंजिनाथने देवासमोर तुपाचं निरांजन प्रज्वलीत केलं. घरात त्याचा विमल, विरळ प्रकाश फुलला. काकूंनी दिव्याला हात जोडले.

"तुम्ही निरोपसा पाठवलात काकू ?"

"दुपारपासनं माझी छाती धडधडायला लागल्याय रे."

"हे आणखी नवं दुखणं कुठलं काढलंत तुम्ही ? छाती धडधडायची ही तिसरी खेप."

"मी कुठून काढणार ? गाववाल्यांची कृपा आहे ती."

"म्हणजे ?"

"गाववाल्यांना आम्ही नको झालो ना !"

"काय लागेल ते बोलता झालं."

"तुला नाही अर्घ्या गावची माहिती."

"मी हळदीसाठी घाटावर गेलोवतो."

"नि इकडे गाववाल्यांचं फावलं. दोन दिवस झाले."

"मग माझ्या कसं नाही कानावर आलं ?"

"येईल."

"पण प्रकार काय आहे तो तर सांगा."

"काय सांगणार ? गाव सोडा म्हणताहेत."

"कुणाची माय व्यायल्याय असं बोलायला ?"

"निळूने पुढाकार घेतलाय म्हणे."

"जळ्ळा निळू पुढाकार घेणार ! पोलीसातून लाथा मारून घालवलेला माणूस तो ! तो काय कर्म पुढारीपण पेलणार ?"

"ते काही असलं तरी सध्या पुढारी आहे ना !"

"विसरा हो सारं ! निळ्याला पुढारी कोण करतोय ?"

"गावात एक चक्कर टाक, म्हणजे कळेल तुला."

"चक्कर टाक कशाला ? लोकच दुकानात येतील माझ्या."

"मग विचार त्यांना. म्हणावं, काकांनी काय घोडं मारलंय तुमचं, तर तुम्ही आता असे उलटल्यायत ? काय चोरी केली, की दरोडा घातला की शिदळकी केली ? काय केलं तरी काय ?"

"नव्हे; उलट ह्या वस्तीचा पाळणा काकांमुळे हालला. एरव्ही आम्हाला गंगेवर पालं टाकावी लागती."

"मी म्हणत्ये, तुम्ही तेही विसरा. काकांनी दस्तुरी गावासाठी काहीही केलं नाही असंही म्हणा हवं तर. पण त्यांच्यावर बहिष्कार घालण्याची कसली भाषा करता ? काय केलंय तरी काय काकांनी तुमचं ? काका ब्राम्हणाच्या पोटी जन्मले हा काय त्यांचा गुन्हा आहे ?"

"काका कुठे गेल्यायत ?"

"ते काय सांगून जातायत ?"

"त्यांनी आवाज चढवला की सारे चूप बसतील."

"ते पुढचं. आजचं मरण कसं चुकवायचं ते सांग."

"मरण-बिरण कसले शब्द वापरताय काकू ?"

"बावा, तीच वेळ आल्याय. वरं, कुठे जाईन म्हटलं तरी आता शक्य नाही रे. पाठीतलं दुखणं घेऊन कुठं जायचं ? कोण थारा देणार आम्हाला ? काय आमच्याकडे सोनं आहे, की हिरेमाणकं आहेत ? बरं, आम्हाला ना पोर, ना टोर. त्यांना मी नि मला ते. आता ह्याच मातीत मिसळणार आम्ही ! पूर्वी मला हे कोकण डोळ्यासमोरसुद्धा नको होतं. पण आता ही वस्ती हाच आम्हाला दिलासा झालाय."

"असं बोलू नकात काकू. तुम्हाला कोण नाही कसं म्हणता ? आम्ही कोणीच नाही तुमचे ?"

"आहात रे; पण समाजापुढे तुमचं काय चालणाराय ?"

"तुम्ही आता स्वस्थपणाने पडा काकू, म्हणजे आराम पडेल तुम्हाला."

"हे गावानं बहिष्कार टाकायचं हत्यार उचललंय नं, ते तू ध्यान कर, म्हणजे मला सगळा आरामही पोचला नि प्रेमही पोचलं."

"त्याचा बंदोबस्त करणं माझ्याकडे लागलं म्हणजे लागलं !"

"आता जे काय दिवस उरल्यायत देवाच्या दयेनं, त्यावेळी हा बहिष्काराचा डांबर नको लागायला. ह्या भूमीसाठी रक्त आटवलनी ह्यांनी !" एवढं बोलून काकू ओक्साबोक्शी रडू लागल्या. त्यांच्या कृश, आजारी चेहेऱ्यावर ओघळणारे अश्रू पाहून मंजिनाथला गुदमरल्यासारखं झालं. तो पडवीतल्या गोणपाटावर येऊन वसला. इतक्यात काकाही तिथे येवून पोहोचले.

"अरे वा ! मंजि, तू आज इथे कसा बावा ?"

"काकूंचा निरोप आलावता."

"काही खास ? "

"त्यांना जरा घावरल्यासारखं वाटलंवतं."

"आता ह्या वयात दुसरं काय वाटणार बावा ?" असं म्हणून ते दोघेही माजघरात गेरे.

"काय ग ? "

"काही नाही. "

"काही नाही कसं ? "

"तुम्ही मागिलदारी हातपाय धुवून या; अंगारा लावा;"

"ते करतो ग."

"मग आधी करा."

"स्वभावाला औषध नाही हेच खरं."

काकूंनी सांगितल्याप्रमाणे काकांनी केलं.

"हं. आता बोल."

"गावात काय कारस्थान शिजतंय ते आलंय काय तुमच्या कानापर्यंत ? "

"भटावर बहिष्कार घालू म्हणताहेत–अरे, त्यांच्या देवालासुद्धा जमणार नाही."

"पण इतकं एकेरीवर कां येतांय तुम्ही? सामोपचाराने घ्या की."

"असल्या अन्नाड्यांबरोबर कसला आला आहे सामोपचार नि कसलं काय ! "

"काय करायचं ठरवलंय तुम्ही ?"








" दत्तावर हवाला टाकायचा नि डोक्याखाली हात घालून स्वस्थ झोपायचं !"

" अशानं ते घात करतील."

" काय विशाद लागल्याय त्यांची !

" पण विषाची परीक्षा घ्याच का मुळात ?"

" आता हे लोक मोहोल्लेवाल्यांच्या कानाशी लागल्यायत. "

"म्हणजे मुसलमानांशी हातं मिळवलनी कीं काय ?"

" आता तूच पहा म्हणजे झालं ! एक ब्राम्हण हिंदूच्या भल्यासाठी उभा राहिलाय, तर त्याच्या तंगड्या ओढायला दुसरे हिंदू, यवनांचं साहाय्य घेतायत !—आणि हे यवनही कुठले ? तर, ज्यांनी ह्या हिंदूंना दहा वर्षांखाली चोप दिला तेच यवन !"

" आता मात्र हात जोडले !" मंजिनाथ म्हणाला.

" अरे, थक्क झालो मी ऐकून !"

" पण तुम्हाला कसं कळलं काका ? "

–" मी गेलोवतो परसोद्याच्या वाकणावर. तिथे भेटला महंमद मास्तर–फार थकलाय हं आता–तर, तो म्हणाला की हे निळू-बिळू नवे लोक मोहल्लेवाल्यांकडे गेले नि म्हणाले की चिबाव्याची आमची घरं काकांनी मागितलीनी तरी परत करू नका, कारण काका परदेशातले हिंदू इथे आणून भरेल नि परस्पर त्यांच्याकडूनच तुमची चटणी उडवेल !"

" काय ह्या लोकांची डोचकी चालतील ते एक परमेश्वरालाच ठाऊक !"

" आता तूच सांग की माझ्याविरुद्ध त्या मोहोल्लेवाल्यांना उठवलं म्हणून ह्यांना कोण ह्यांचा काका विल्ले देणाराय ?"

" आपले हितकर्ते ओळखता न येणं ह्यापरतं दुर्दैव नाही. "

–" कसं बोललास !

" अहो, पुन्हा बघा माझी छाती धडधडायला लागलीय ! "

" आणि अशा परिस्थितीत गळयात हे एक लोढणं ! "

मग टाका विहिरीत. म्हणजे तुम्हीही सुटलात नि मीही सुटल्ये ! "

" आणि हल्ली ही अस्सं वेडंबिद्रं बोलत असते."

काकू स्फुंदून स्फुंदून रडू लागल्या. थकलेले काका बाजेच्या कडेवर बसले. हळूहळू त्यांनी काकूंची पावलं रगडायला सुरुवात केली. नि:शब्द अंधार वाढू लागला. त्याचा फायदा घेऊन मंजिनाथ मांजराच्या पावलाने निसटला.

जेवणं झाल्यावर काका रेज्यांच्या पडवीत येऊन बसले. त्यांना चूड हातात घेतलेला एक इसम त्यांच्याच दिशेने यताना दिसला. काकांनी विचारलं,

" कोण आहे ?"

" मी; नरसू शिरसाटांचा मुलगा."

" म्हणजे कुशाभाऊच म्हण की ! नि इतक्या रात्रीचासा ?"

" दिवसा वेळच फावेना. "

" बरं. बोल काय म्हणतोस बाबा ? तुझा पाळणा जोजवलाय हो मी ! तुझा बाप नि आम्ही दोस्त मंडळी."

" तेव्हा पेरलेलं आता उगवतंय !"

" आणि आता उगवतंय ना, ते उद्या उत्तम फुलेल ! निसर्गाचा नियमच आहे. म्हणून मी सर्वांना सांगतो, बाबांनो, पेरा! पेरते व्हा ! पेरलेलं फुकट म्हणून कसं ते जायचं नाही."

" काकू कशा आहेत ?"

" उत्तम."

" त्यांची पाठ दुखत्याय म्हणे."

" सहा वर्षं झाली. जागच्या जागी आहे. काय करणार ? "

" औषधोपचार केलेत ? "

"राजापूर-कणकवलीच्या परिसरातला एक धन्वंतरी सोडला नाही ! पण अखेर दत्ताच्या मनात असेल तसंच होणार. तुम्ही-आम्ही औषधपाणी करण्यापलीकडे काय करू शकतो ? "

" मीसुद्धा तुम्हाला थोडं औषधपाणी सांगणाराय."

" म्हणजे?"

" म्हणजे असं की गावातलं वातावरण संपूर्णपणे तुमच्या उलट फिरलंय. तेव्हा तुम्ही सुरक्षित जागी जावं हे उत्तम."

" पण हे असं आताच काय झालंय ? वास्तविक पहाता आपला देश आता स्वतंत्र झाला. म्हणजे आपण कसं गुण्यागोविंदाने वागलं पाहिजे; भावाभावासारखं वागलं पाहिजे."

" त्यांना ब्राम्हण लोक आता नको आहेत."

"मग 'लोकमान्य टिळक की जय' रे कसं म्हणता ? टिळक ब्राम्हणच होते ना ? "

" टिळकांनी स्वराज्याचा लढा दिलावता."

" तसे आजचे चांगले ब्राम्हण सुराज्याचा



चक्र ( म ) भूषण !

अनुक्रमणिका







पाया घालतील !"

"त्यांना शंका वाटते."

"ह्या म्हणण्यात काय अर्थ आहे? रानडे-टिळकांना एक न्याय नि तर ब्राम्हणाना दुसरा न्याय–ही काय रीत झाली ?"

"रीत असो अगर नसो, मी तुम्हाला जागं करायला आलो."

"ते बरं केलंस."

"बऱ्या आणि वाईटाचा प्रश्न नाही. आमच्या वडिलांचे तुम्ही मित्र. म्हणून मी कर्तव्य बजावलं."

"तेही बरं केलंस. माणसानं आपलं इमान राखावं."

"मग आता काय ठरवलंय तुम्ही ?"

"जे एकदा ठरवलं ते ठरवलं."

"म्हणजे ?"

"सध्या बंगालचे हिंदू होरपळतायत. त्याना ह्या भूमीतून मदत पाठवेन !–नि, ह्या भूमीला नाव मिळवून देईन. परशुरामाची भूमी आहे ही !"

"इथे तुम्हाला छदाम दिसणार नाही; टिपून ठेवा माझे शब्द."

"न का दिसेना ! मी उदईक निघतोय राजापुराला. तिकडून काही हालचाल करता येते काय ते पाहीन. आपल्या हरिश्चंद्रकर वकिलांचा मुलगा तिथेच असतो."

"अशी मदतीची कामं काय कोकणातल्या ओसाड गावातून होतात? त्याला मुंबैसारखी बाजारपेठ हवी."

"खरं नाही हे."

"ठीक आहे. कोंकणात पैसा उभा झाला तर त्यात मला आनंदच आहे."

"आणि तो आनंद तुला लौकरच चाखायला मिळेल !" काकांनी निक्षून सांगितलं.

रात्री अंथरुणावर पडल्या पडल्या काकांना मनस्वी समाधान वाटत होतं. त्यांना संतोष होता की धर्माचं फार मोठं काम त्यांनी खांद्यावर घेतलं होतं–परशुरामाने जसं खांद्यावर खड्ग घेतलं होतं, तसं.

* *

## [ १८ ]

दोन दिवस भाकड गेले. कुशाभाऊ गेल्यानंतर दुसऱ्या दिवशीच्या पहिल्या कोंबड्याला राजापूरची घाटी पकडायचं काकांनी पक्कं केलं होतं. पण रात्रीपासून काकूंची छाती अधिकच धडधडायला लागली. काका तरीही निघत होते. पण शेवटी काकूंनी दत्ताची शपथ घातली तेव्हा त्यांचा नाईलाज झाला. पुढे सगळीच गणितं चुकत गेली. हळदीसाठी मंजिनाथ घाटावर सांगलीला निघून गेला. गेल्या नऊ वर्षात एकमेकांची सावली चुकवीत राहिलेले मोहल्लेवाले आणि दस्तुरी गावचे लोक एकमेकांकडे जाऊ-येऊ लागले. तळ्याकाठच्या झाडावर खंड्या चोच परतून बसतो, तसे काका एकटेच गावगंगेच्या काठावर बसून होते.

"तुमच्या वाटची मी क्षमा मागू का ?" काकूंनी विचारलं, "माझी तयारी आहे."

"माझी चूक असती तर एकदा नाही लाखदा क्षमा मागितली असती मी स्वत: पण इथे क्षमेचा प्रश्नच येत नाही."

"पण कत्तलीत होरपळलेल्या हिंदूंची जबाबदारी तुमच्या डोक्यावर कुणी ठेवल्याय ?"

"माझं मन मला ढुसण्या देतंय ना आतून ! त्याला मी काय सांगू ?"

"असं म्हटलं म्हणजे दुसऱ्याला बोलायला जागाच नको."

"खरोखरीच तशी परिस्थिती आहे. आजपर्यंत मी कधी असत्य बोललोय का ?"

"मग मला मुंबैला नेत नाहीत तर."

"तू दुखणेकरी. तुला मी आणखी त्या गोंधळात कुठे सोडू ?"

"तुम्हीही चला."

"कालत्रयी अशक्य !"

"मग ठरवलंय तरी काय तुम्ही ?"

"आत्ता हातावर पाणी पडलं की राजापुरास निघायचं. रात्रीच्या दशम्या बांधून घेतो. नि उद्या पहिल्या कोंबड्याला निघून सकाळी इथे हजर होतो."

"कशाला धावपळ करता दुपारची ? हल्ली ऊन काय असं तसं पडतंय ? घेरी येईल तुम्हाला."

"आम्ही उन्हाला घाबरायचं नि तिकडे हिंदूंच्या कत्तली चालू द्यायच्या !"

"मग जा बापडे ! मी तरी काय सांगणार ?"

"तू सांगण्याचा प्रश्नच नाही. माझं मन मला काय सांगतंय, हा प्रश्न आहे."

"तुम्ही नि तुमचं मन, कुठे लागेल तिकडे जा !"

कुठे लागेल तिकडे न जाता मनाचा आदेश प्रमाण मानून काका राजापुराची घाटी तुडवीत गेले. नेहेमी ह्या घाटीवरून जाताना हिरव्या रानाचं आणि दूरच्या डोंगरमाळांचं रूप त्यांचे डोळे मिटक्या मारीत पीत असत. सकाळ असली की केशरी प्रकाशाचं वस्त्र चराचरावर पडे. संध्याकाळ असली की निळं आकाश गडद रंग धारण करू लागे. कोकणाच्या सृष्टीची ही सर्व रूपं त्यांना अतिप्रिय होती. ह्यावेळी मात्र काकांचं सगळं लक्ष राजापूर कधी गाठतो इकडे होतं. वाणासारखे ते नाकासमोर चालले होते.

अखेर राजापूर आलं. टेपावरून त्यांनी तें जुनं गाव पाहिलं. उंचावरली हायस्कूलची भव्य इमारत डोळ्यात भरत होती. वकीलपट्टी खोलगटात होती. अगदी खालच्या पातळीवर नदीचा फाटा वाहात होता. त्याच्या पलीकडे उन्हाळ्याकडे जाणारी बोडकी वाट दिसत होती. भव्य दगडी पूल ओलांडून ते वकीलपट्टीकडे वळले. आता उन्हं उतरली होती. दिवेलागणीच्या आत राजापूर गाठल्याचा त्यांना आनंद झाला. मात्र, त्या सर्व रस्त्यावर सामसूम झालेली पाहून त्यांना थोडसं आश्चर्यही वाटलं.

आश्चर्य करीत ते भटाळीतला निर्मनुष्य रस्ता कापीत राहिले. वळणावरच्या कम्पौंडावर हरिश्चंद्रकर वकिलांची बटबटीत पाटी टांगलेली त्यांनी पाहिली. तिथे कानोसा घ्यावा म्हणून ते वळले. रेज्यांच्या पडवीत दार लावून घेऊन हरिश्चंद्रकर वकील घाबरलेल्या पोपटाच्या नजरेने रस्ता निरखीत होते. काकांनी त्यांना ओळखीची हाक घातली. वकील डोळे विस्फारून

अनुक्रमणिका

म्हणाले, "आता आणखी ह्या आपत्तीत तुम्ही इकडे कसे ?" काका चरकले.

"आपत्ती ? कसली आपत्ती म्हणता ?"

"म्हणजे माहीत नाही तुम्हास ?"

"नाहीबा !"

"अजबच आहे."

"पण झालंय तरी काय ?"

"पुलावर काय ऐकलेत ?"

"पुलावर कुणीच नव्हते."

"नि वाजारपेठेत ?"

"तिकडेसुद्धा शुकशुकाट. तरी मी म्हणतोय की हे असं कां ?"

"अगोदर आत या."

"अहो, पण झालंय काय ?"

"अगोदर पटकन् आत या कसे."

काका पडवीत गेले. वकिलानी दार लावलं. ते नीट लागल्याची खात्री करून घेतली आणि मग काकांच्या कानात सांगितलं;

"गांधीला उडवलेनी !"

काका सुन्न झाले.

"काय सांगता काय ?"

"खोटं सांगायला काय मला वेड लागलंय ?"

"तुम्हाला कुणी सांगितलं ?"

"गावभर झाल्याय वातमी."

"तुम्हाला केव्हा कळलं ?"

"जवानी घेतल्यासारखं बोलू नका. मी म्हणजे मंजिनाथ वाणी नव्हे."

"मी जिज्ञासेने विचारलं."

"मग सांगतो. आत्ता सहाच्या सुमाराला वावडी उडाली."

"कहर आहे ! कुठे घडलं हे कर्मं ?"

"म्हातारा नौखालीला की कुठे गेल्याचं वाचलवतं मागे."

"कशाला जायचं अशा नवख्या; मुलखात ?"

"विनाश काले विपरीत बुद्धी !"

"तेही खरंच आहे म्हणा."

"शास्त्रवचन काय खोटं होणार ?"

"पोष्टात तार आली वाटतं ?"

"छ्या. गनीशेटकडे बॅटरीवर चालणारा रेडीओ आलाय ना !"

"मग खरंच असणार."

"तुम्हाला बरे एकेक संशय येतात!"

"कुणी केलं असेल हे कृत्य?"

"गांधी कुठल्या धर्माचा होता?"

"अर्थात, हिंदू."

"त्यावरून यवनाने त्याचा मुडदा पाडलन हे उघड झाले."

"चांगला पुण्यवान प्राणी होता. पण अखेर काय गत झाली बघा."

"तुमच्या सर्टीफिकीटाला कोण विचारतो? चित्रगुप्तानं काय लिहिलेन असेल ते खरं."

"तरीदेखील प्राणी पुण्यवान खराच. मरतो कुठे नि सामसूम होते कुठे! कुठे नौखाली नि कुठे गांवढे राजापूर!"

"आज दंगा होणार, नि मुसलमानाना पिटणार." वकिलानी सांगितलं.

"सगळीकडे पिटापिटीच ऐकू येत्याय."

"करावं तसं भरावं. हिंदूला मारायला सांगितलंवतं कुणी? नि, समजा तुम्हाला वाटलं मारावसं, तरी काय रानात एकटा-दुकटा गाठून मारायचा? हिंमत असेल तर शहरात मारून दाखवा ना!"

"दंगा होणार म्हणता?" काकांनी विचारलं.

"होणार? अहो, पेटणार! आपल्या लोकांनी तयारीसुद्धा केल्याय."

"तरीच म्हटलं एवढी बाजारपेठ शांत कशान्!"

"उद्या यायचं होतं म्हणजे भस्मात गाढवं लोळताना दिसली असती."

"निघतो मी."

"खरं, मुख्य तेच विचारायचं विसरलो. आज इकडे कुठे आलावतात?"

"त्या हिंदूंना मदत पोचवायची होती."

"माझे आई, मरोत ते हिंदू, तुम्ही आता तुमचे स्वत:चे जीव वाचवा म्हणजे मिळवलीत!"

"आज वस्तीच्या हिशोबाने आलोवतो. दशम्या आणल्यायत."

"एरव्ही थांबा म्हटलं असतं. पण आज हा असला प्रकार."

"आत्ता निघालो तरी रात्री दहाच्या आत पोचेन."

"मग निघा तर. सोबतीला मात्र कोण नाही येणार."

"पायाखालच्या रस्त्याला सोबत कशास हवी? पण कंदील मात्र द्या."

"आता दिलाच पाहिजे, कारण दिवसच असा चमत्कारिक आहे. मात्र घासलेट तुम्ही आपल्या दिडक्यांनी भरून घ्या."

"तुमच्याकडे असेल तर बघा, कारण आज बाजारपेठेत मिळणं मुष्कील दिसतंय."

"थेंब नाही घरात. नुसता कंदील देतो. तो न्या नि तावडतोब माघारी लावून द्या."

"बरं."

"बरं नाही—तावडतोब माघारी लावून द्यायला हवा कंदील. तरच मिळेल."

हो—ना करता करता वकिलांनी कंदील द्यायचं ठरवलं. ते माजघरात गेले. कोपऱ्यात खुंटीला कंदील अडकवलेला होता. त्यांनी तो हलवून बघितला. आतलं तेल वाजलं. त्यांनी ते नीट काढून घासलेटच्या डब्यात ओतून ठेवलं आणि कंदील कोरडा ठाक झाल्यावर तो काकांच्या स्वाधीन केला.

रिकामा कंदील घेऊन काका बाजारपेठेत उतरले. सगळी दुकानं बंद होती. एका दुकानाची फळी उघडी दिसली. काकांनी तिथे तपास केला. तेल नसल्याचं कळलं. आणखी एका ठिकाणी डोकावले. तिथेही नन्नाचाच पाढा.

काळोख पडला. सगळं राजापूर काळोखाचा भाग बनलं. आता काय करायचं? काकांनी निर्णय घेतला की सरळ घाटी तुडवायची नि दस्तुरी गावात हजर व्हायचं दुसरा इलाजच नव्हता. एका हातात दशम्यांची पिशवी आणि दुसऱ्या हातात हरिश्चंद्रकर वकीलांचा रिकामा कंदील घेऊन काका एखाद्या सराईतासारखे घाटी तुडवू लागले. दस्तुरीगाव पावला-पावलाने जवळ येऊ लागला.

काका झपझप चालत होते. वारा पडला होता. त्यामुळे आवाज फक्त त्यांच्या पायतणांचाच होत होता. त्या लयीवर त्यांची पावलं घाटीच्या चिऱ्यांवर भराभर पडत होती. दस्तुरीगाव जवळजवळ येऊ लागलं.

उंबराच्या वाकणावर आल्यावर श्वास टाकण्यासाठी काका जरा उभे राहिले. आजुबाजूला कुठेच काही दिसत नव्हतं दिशा काळ्या कुट्ट झाल्या होत्या.

आणि नको तो प्रकार घडला! एकाएकी वाऱ्याचा जोरदार लोट खलाटीतून घाटीवर, घणस उंदरावर झडप घालायला फों-फों करीत सळसळत यावा, तसा आला. काकांनी सावध पवित्रा घेतला. वारा पानांना झोंबला. पानांचा सळसळाट झाला. भांबावलेली पाखरं चित्कार करीत घिरट्या घालू लागली. पाचोळा गरगरू लागला काकांनी वर पाहिलं तेव्हा उंबराच्या पानात त्यांना प्रकाशाचा एकदम लोळ दिसला! त्यांनी ओळखलं की हा चाळा आहे आणि ह्याच्यापुढे शहाणपण नाही. पायतणं घट्ट करून ते जवळजवळ धावतच घाटी उतरू लागले. चाळा त्यांच्या मागे लागला. ते धावू लागले तसं प्रत्येक झाड पिळवटून सळसळू लागलं. त्यांना काय होतंय कळेना, की काय होणार आकळेना. घामाघूम झालेले काका मग टाहो फोडून काळोखात ओरडले,

"भूतनाथाची शपथ आहे तुला!"

शपथ ऐकल्याबरोबर चाळा क्षणात बंद झाला. वाऱ्याचा लोट थांबला. झाडांचं पिळवटणं थांबलं; पानांची सळसळ थांबली; पाखरं परत घरट्याकडे पंख न फडफडवता वळली. सगळं आसमंत शांत झालं.

घाटीच्या उतरंडीवर, घामाने ओलेचिंब झालेले काका श्वास रोखून झाला प्रकार घोळत राहिले. अखेर भूतनाथाने आपला शब्द ऐकला म्हणून त्यांना भरून आलं. हातातल्या दशम्या त्यांनी वेताळाच्या पिलाकूळीसाठी तिथेच टाकून दिल्या आणि मोठ्याने ओरडून ते म्हणाले,

"देवा भूतनाथा, येत्या जत्रेत मी तुला केशरी अंगरखा घालेन!"

शपथ हवेत विरल्याबरोबर वाऱ्याचा मंद झुळका वाहू लागल्या. गवतं डुलू लागली. आणि एक हात मोकळा झालेले काका दुसऱ्या हातात रिकामा कंदील हेलकावीत देवाला धन्यवाद देत देत घाटी शांतपणे उतरू लागले.

अनुक्रमणिका






थोड्याच वेळात ते आपल्या घरासमोर हजर झाले.

कांकूंचं घायाळे कण्हणं त्यांना अंगणा-तच ऐकू आलं. उन्हात लोळणाऱ्या मांजरासारखं निर्धास्त झालेलं त्यांचं मन पावसात भिजलेल्या पाखरासारखं एकदम आक्रसलं. ते मोठा धीर करून आत गेले. देवासमोर निरांजन तेवत होतं आणि काकू देवासमोर हात जोडून बसल्या होत्या. विमल प्रकाशात त्यांची छाया भिंतीवर भेसूरपणे पसरली होती. काकांनी विचारलं,

"अग, असं कसं वरं बसायचं ?"

"तुम्ही सकाळी येणारे; ते असे रात्री कसे परतलात ते सांगा अगोदर." काकूंनी आश्चर्याने विचारलं.

"हातपाय धुतो, अंगारा लावतो नि नंतर तुला सविस्तर सगळं सांगतो. पण तू अशी कां बसल्यायस ते अगोदर सांग."

"संध्याकाळपासनं माझी छाती धडधडा-यला लागली. बोलवायचं तरी कुणाला? मंजिनाथ सांगलीला गेलेला."

"हे काय नवंच दुखणं काढलंयस तू? ऐकावं तेव्हा आपली तुझी छाती धड-धडते !"

"मी काय आमंत्रण का दिलंय दुखण्याला ?"

"तसं नाही म्हणत मी, पण छाती धड-धडणं बरं नाही."

"मी काय करू ? मला भीती वाटते."

"कसली ?"

"पुढे काय होईल त्याची. आपल्याला अखेर कोण आहे ?"

"आता इतकं वय झालं, तरीही देवावर विश्वास नाही टाकवत तुला ? मग उरलेलं आयुष्य निभवणार कसं ?"

"विश्वास आहे हो; पण तरीसुद्धा भीती वाटते."

"ह्याचा अर्थ सरळ आहे. भीती वाटायची सवय लागलीय तुला."

"नाही लागणार ? हल्ली दररोज भयानक घटना घडताहेत."

"त्या पूर्वीसुद्धा घडत होत्या ग."

"पण आता काही ताळतंत्रच उरलेला नाही. मारून टाकायला काय मेल्यांना एकटा गांधीच उरलावता ?"

"अस्सं ! म्हणजे बातमी पाण्यासारखी पाताळात झिरपत चालल्याय तर !"

"तुम्हाला केव्हा कळलं ?"

"राजापुरात."

"मग खरंच असणार. आपले लोक मुसलमानांचा काटा काढायची तयारी करतायत म्हणे."

"तिथेही तेच चाललंय."

"मग परतलात हे बरं केलंत."

"गावात काय बोंब आहे ?"

"काठ्या, बांबू, फरश्या, घासलेट—काय मिळेल ते गोळा करतायत म्हणे."

"आता मरण आहे मुसलमानांचं. वास्त-विक पाहाता ह्यांचा संबंधच काय ह्या हत्येशी ?"

"तुम्ही कशाला कढ घेता त्यांचा ? नसती भानगड उपस्थित करू नका. अगोदरच माझी छाती धडधडत्याय; नि त्यात आणखी तेल पडायला नको."

"बरं; नको तर नको. नाही मी बोलत."

"देवाची शपथ घ्या माझ्या समक्ष."

"भलत्याच लांगड्यात तू मला अडकवू नकोस; नाही बोलणार म्हटलं ना मी ? मग विश्वास ठेव."

इतकं सगळं त्राग्याने सांगून काका मागल्यादारी पाय धुवायला केळीत गेले. केळीच्या बुंधात काहीतरी सळसळतंय असं त्यांना वाटलं. म्हणून ते गेले तसे मागे आले. मागल्या दाराला त्यांनी कोयंडा घातला. पुढल्या अंगणात पाय धुतले आणि अगस्तीला शपथ घालून, अंगारा लावून ते अंथरूणावर आडवे झाले. काकू त्यांचे पाय चेपू लागल्या. त्या वत्सल स्पर्शाच्या संजी-वनीने पुलकित झालेले काकांचे दमलेले शरीर क्षणार्धात झोपेच्या आधीन झाले.

बाहेर काळोख 'मी' म्हणत होता.

☆ ☆

## [ १९ ]

दुसऱ्या दिवशी दस्तुरीगाव जागा झाला तो महंमद मास्तर तांबे नातवंडांना घेऊन चिवाव्यातून रातोरात पळाला ही बातमी ऐकायला ! सर्वांनी सदू नावेलकर न्हाव्याच्या डोक्यावर टेपर फोडलं. निळूने तर सावंतांच्या हॉटेलात त्याला सरळ सरळ फायलावरच घेतला,

"तरी मी तुला बोललोवतो की बापूच्या घाटीवर तू उभा रहा नि पहारा कर. आता मार बोंब !"

"मी अख्ख्या रातचा कुठे उभा ऱ्हानार घाटीवर ?"

"कां ? कातळावर काय निबार पडलांवतां ?"

"निबार पत्करलां. पण रातचो काळोख नको."

"कां ? चाळेगत वाटमारी करेल ?"

"चाळेगतीस भीत नाय मी. भुताचे दात उपटून त्याच्या हातावर ठेवेन."

"मग का नाय तू उभा राहिलास ?"

"घाटीवरना कोल्हे फिरतत रातचे."

"एका तोंडानं असं म्हणा नि दुसऱ्या तोंडानं चोर पळाला म्हणून रडा ! वा रे वा !"

"दुसरे मुसलमान काय तोटचाचे गेल्यात ?"

"प्रश्न तो नाय. मुख्य माणूस पळाला अशी नामुष्की नाय."

"पण त्याहीपेक्षा एका हिंदूचा बळी घेतला जातो नि इतर हिंदू नुसते चूप बसतात ह्यासारखी नामुष्की नाही" कुशाभाऊने सिद्धांत मांडला.

"मग तुमी काय करनार ?"

"आपली बॉ तेवढी पॉवर नाही. एरव्ही सामना करायला मी डरलो नसतो." कुशाभाऊने कबुलीजबाब दिला.

"आता काल घासलेटीचा डबा जमवलां, त्येचा काय करायचां ?"

अनुक्रमणिका






"तुझ्या डोचक्यावर ओतून घे. मी कांडं लावतो."

"नाय आपलां आठवलां म्हनून विचारलां."

"आता तुमाला सगलां आठवेल. पण काल रातचा पाहारा करायचां काय कुनाला आठवलां नाय !

"अजून त्यांची पाच-पन्नास घरां असतीलच बाकी."

"मी सांगतु ते ऐका. अगुदर राजापुरवाले काय करतात ते बघूया."

"अशी ढकलपंची नको. ही धर्माची बाब आहे."

"मग तुमी राजापुराला जावा नि वातमी काय हायती लौकर आणा."

"मी काय म्हटलं ? माझ्यात ती पॉवर नाही—नि कशी असणार ? आम्ही सगळे प्रापंचिक पडलो ना !"

"मग थांवा तर राजापूरची खवर येईस्तंव."

हे सर्वांना पटलं. सगळेजण सावंतांच्या हॉटेलात माल न मागवता स्वस्थ बसून राहिले. तितक्यात साटम पोष्टमन तरातरा निघालेला सर्वांना दिसला.

"इतक्या घाईतसे ?" सदूने विचारलं.

"काय विचारू नको काय घाई आहे ती ! कधी नाय ती रजा मिळाली. म्हणून चाललोय परसोद्याला. आमचा मेवना असतो नाय तिथे ?"

"कसली रजा म्हणतां ?"

"म्हणजे ? गांधी मेलो माहीत नाय ? कालच आटोपलो."

"ते समजलां. पण तुमाला हुकूम केव्हा आला ?"

"हुकूमाची वाट बघायची झाली तर पुढचा महिना उजाडणार !"

"आणि समजा सरकारनं नाय दिली रजा म्हंजे ?"

"हे न्हावी लोक म्हणजे असाच नांट लावणार निस्कारण !"

"अवो, पन ऐका तरी—"

पण साटम पोष्टमनला असली नन्नाची भाषा सकाळच्या प्रहरी, निदान न्हाव्याच्या तोंडून तरी ऐकायची नव्हती. परसोद्याच्या मेव्हण्याच्या चुलीवरल्या मटणाचा भपकारा त्याच्या नाकात



शिरला होता. त्या स्वादाच्या नादात तो लांब लांब टांगा उडवीत निघून गेला. सदूने इतरांना सांगितलं,

"आता हा वडे नि मटणां पोट फुटंस्तंवर खाणार नि अख्खा दिवस झोपून काढणार. ह्या लोकांचा आपलां बरां फावलां !"

सूर्य डोईस आला तरी राजापुराहून कसलीच खवर आली नाही. सगळे कंटाळले. कुशाभाऊने विचारले,

"मुळात, गांधी मेले हे तरी खरं ना ?"

"त्याशिवाय काय महंमद मास्तर पळाला ?"

"हे मात्र पटलं बुवा !"

"आणि गांधी न मरता, तर साटम पोष्टमनाचं काय थोवाड लागलंवतं रजेवर जायला !"

"पण कदाचित गांधीला नुसता मार बसला असायचा !"

"म्हंजे आमच्या बेताचा सत्यानास होनार !"

"आज सांजेपावेतर आपुन वाट बघूया वातमीची."

सर्वांना मान्य असलं तरी मंडळींना संध्याकाळपर्यंत तिष्ठावं लागलं नाही. छाती फों-फों करीत मंजिनाथ दुपारीच दुकानात हजर झाला. घाटावरून मंजिनाथ परतल्याची बातमी क्षणात सर्वत्र फिरली. तुळसकरांच्या दुकानावर माशांसारखी माणसं लोटली.

"देवाशपथ सांगतो, गांधीजींचा खून मुसलमानांनी नाही केला; चक्क हिंदू ब्राम्हणाने केला !" कंठाची चामडी ओढून मंजिनाथाने पुन्हा पुन्हा सांगितलं.

"हे तुला केव्हा कळलं ?" काकांनी विचारलं.

"जगभर बातमी झाल्याय."

"आणि तुळसकरांचे पोरगे खोटां सांगनारच नायत." सदूने निर्वाळा दिला.

"असं कृत्य ब्राह्मणाच्या हातून, खरं म्हणजे घडायचं नाही. हे कसं झालं हरी जाणे."

"बामण बेश खून करतील ! राघोबानं नाय केलान ?"

"आता दिवस वदलल्यायत."

"आमी—आमी वदलले; बामणांनी नाय बदललानी."

"खरंच सांगतो काका, जिकडे पहावं तिकडे जाळपोळ चालल्याय. मिरजेत हा ऽऽ धूर ! एकजात ब्राह्मणांची घरं जाळली. नुसती रडारड नि पळापळ."

"हे सगळं लोक म्हणतात, की तू प्रत्यक्ष पाहिलंस ?"

"देवा शपथ सांगतो. मी माझ्या ह्या-ह्या डोळ्यांनी पाहिलं. जाळपोळ नि धावपळ; धावपळ नि जाळपोळ."

"पण सरकारचे पोलीस काय करतायत ?"

"ते काय करणार ? सगळीकडेच गोंधळ. हळद निम्म्या दरानंसुद्धा विकत घ्यायला कोणी तयार नाही."

"तेही खरंच. हळद घेणार की जीव वचावणार ?"

"ब्राह्मणांचा काटा काढताहेत बघा !"

"म्हणजे मारणारा कोण नि शिक्षा कुणाला ?"

"आणि सांगायचं राहिलंच—खून दिल्लीलाच झालाय."

"कमालच आहे ! राजधानीत, आणि खून ?"






# फिल्म इन्स्टिटयूट ऑफ इंडिया, पुणे

## प्रवेश मिळवू इच्छिणाऱ्यांकरिता सूचना

संस्थेच्या ता. १ जुलै १९६९ या शैक्षणिक वर्षापासून नियमितपणे सुरू होणाऱ्या पहिल्या वर्षाच्या खालील शिक्षण-क्रमासाठी अधिकृत छापील फार्मावर उमेदवाराकडून अर्ज मागविण्यात येत आहेत.

**१) दिग्दर्शन** (Direction)–तीन वर्षे ; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता:** आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. **वय:** १९ ते ३० वर्षे १।७।१९६९ ला पूर्ण.

**२) चित्रपट कथा लेखन** (Screenplay Writing)– तीन वर्षे; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता:** आर्टस् किंवा सायन्सची पदवी किंवा तत्सम पदवी प्राप्त. **वय:** १९ ते ३० वर्षे १।७।१९६९ ला पूर्ण.

**३) चलत्‌चित्र छायालेखन** (Motion Picture Photography) तीन वर्षे, **कमीत कमी शैक्षणिक पात्रता–** पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र, किंवा तत्सम विषय घेऊन इंटरमिजिएट (ज्या उमेदवारानी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल मात्र त्यांनी पदार्थ विज्ञान शास्त्र व रसायन शास्त्र हे विषय त्या परीक्षेसाठी घेतलेले असावेत) किंवा फाइन आर्टस् (पेंटिंग)ची विश्वविद्यालयाची किंवा अधिकृत मान्यता असलेल्या संस्थेची पदवी किंवा डिप्लोमा. मॅट्रिकनंतर डिप्लोमाचा अभ्यासक्रम दोन वर्षाचा पूर्ण केलेला असावा. **वय:** १७ ते ३० वर्षे १।७।१९६९ ला पूर्ण.

**४) ध्वनिमुद्रण आणि ध्वनी स्थापत्यशास्त्र** (Sound Recording And Sound Engineering)-तीन वर्षे; **कमीत कमी शैक्षणिक पात्रता:** पदार्थ विज्ञान शास्त्र, रसायनशास्त्र, व गणित किंवा तत्सम विषय घेऊन इंटर मिजिएट उत्तीर्ण (ज्या उमेदवारानी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या शास्त्राच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल मात्र त्यांनी पदार्थ विज्ञान विज्ञान शास्त्र, रसायन व गणित हे विषय या परीक्षेसाठी घेतलेले असावेत.) **वय:** १७ ते ३० वर्षे १।७।१९६९ रोजी पूर्ण.

**५) चित्र संकलन** (Film Editing)–दोन वर्षे. **कमीत कमी शैक्षणिक पात्रता:** इंटरमिजिएट आर्टस् किंवा सायन्स किंवा तत्सम परीक्षा उत्तीर्ण. ज्या उमेदवारानी हायर सेकंडरी परीक्षा उत्तीर्ण केली आहे अशानाही तीन वर्षाच्या पदवी परीक्षेचे पहिले वर्ष उत्तीर्ण होताच प्रवेश देण्यात येईल.) **वय:** १७ ते ३० वर्षे १–७–१९६९ ला पूर्ण.

**६) चित्रपट अभिनय** (Film Acting)–दोन वर्षे. **कमीत कमी शैक्षणिक पात्रता–** मॅट्रिक्युलेशन किंवा तत्सम परीक्षा इंग्रजी हा एक विषय घेऊन उत्तीर्ण. हिंदीचे कामचलाऊ ज्ञान आवश्यक. विशेष लायकीच्या स्त्री उमेदवारास ही अट शिथील केली जाईल. **वय:** १६ ते २५ वर्षे मुलींकरिता आणि १८ ते २५ वर्षे मुलांकरिता १।७। १९६९ ला पूर्ण.

**प्रवेश परीक्षा**–पुरुष उमेदवार / स्त्री उमेदवार विश्वविद्यालयीन बोर्डाच्या परीक्षेस एप्रिल / मे / जून १९६९ ला परीक्षेस बसला / बसली असेल आणि त्याचा / तिचा निकाल संस्थेच्या त्या वेळच्या प्रवेश परीक्षेपर्यंत मिळू शकला नाही तर त्याने / तिने संस्थेच्या त्यावेळी होणाऱ्या प्रवेश परीक्षेपर्यंत तो / ती ज्या संस्थेत शिक्षण घेत असेल त्या संस्थेच्या प्राचार्यांचे / प्रमुखाध्यापकांचे त्याचा निकाल लागे तो पर्यंतच्या मुदतीचे प्रशस्तीपत्र सोबत असले पाहिजे. प्रवेश परीक्षेत निवडलेल्या उमेदवारास तात्पुरता प्रवेश दिला जाईल. पण त्याला नियमानुसार आपण आवश्यक ती परीक्षा उत्तीर्ण झालो आहोत असे ३१ जुलै १९६९ पर्यंत लेखी पुरावे सादर केले पाहिजेत. हे न झाल्यास त्याचा / तिचा तात्पुरता प्रवेश रद्द केला जाईल. आणि त्याने / तिने भरलेली फी परत केली जाणार नाही.

विविध शिक्षणक्रमाच्या अभ्यासासाठी प्रवेश परीक्षेच्या आधारावरच प्रवेश दिला जातो. दिग्दर्शन, चित्रपट कथालेखन, चलच्चित्र छायालेखन, ध्वनीमुद्रण, ध्वनी स्थापत्यशास्त्र व चित्र-संकलन या परीक्षांकरिता लेखी व तोंडी परीक्षा द्यावी लागेल. लेखी परीक्षा मुंबई, दिल्ली, कलकत्ता व मद्रास येथे ११ मे १९६९ (रविवार) या दिवशी घेतली जाईल. या लेखी परीक्षेत लायक गुण मिळविणाऱ्या सर्व उमेदवारांस तोंडी परीक्षेसही बसावे लागेल व ती परीक्षा संस्थेत **२४ ते २८ जून १९६९ या काळात होईल.** चित्रपट अभिनयाकरिता ठेवलेल्या प्रवेश परीक्षेत आवाजाची चाचणी व पडद्यावरच्या हालचाली यावाबत विशेष लक्ष पुरविले जाईल. या चाचणी परीक्षा मुंबई, दिल्ली, कलकत्ता व मद्रास येथे मे १९६९ च्या सुरुवातीस होतील. निश्चित तारखा उमेदवाराना योग्य वेळी कळविल्या जातील.

**शिष्यवृत्त्या**–विविध विषयांच्या बाबतीत विशेष आवड आणि उत्साह दाखविणाऱ्या आणि समाधानकारक प्रगती करणाऱ्या उमेदवाराना खास सवलती दिल्या जातील. केंद्र सरकार, आंध्रप्रदेश सरकार, आसाम, बिहार, गुजरात, केरळ, महाराष्ट्र, म्हैसूर, मध्य प्रदेश, ओरीसा, पंजाब, पश्चिम बंगाल व मद्रास राज्ये आणि संगीत नाटक संगम यातर्फे लायक विद्यार्थ्यांसाठी पारितोषिके व शिष्यवृत्त्या ठेवलेल्या आहेत.

**हॉस्टेल**–मुलां-मुलींकरीता संस्थेमार्फत वेगवेगळी हॉस्टेले चालविली जातात.

**अर्ज कसा कराल**– संस्थेच्या माहिती पत्रकासोबतच अर्जाचा नमुना शिक्षणक्रमांची अधिक माहिती, प्रवेश परीक्षा, शिष्यवृत्त्या इ. इ. सर्व ती माहिती पुरविली जाते. हे सारे साहित्य **प्राचार्य, फिल्म इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया, पुणे ४** या पत्त्यावर १ रुपयाची क्रॉस पोस्टल ऑर्डर पाठवून मागविता येईल. क्रॉस पोस्टल ऑर्डर 'प्राचार्य, फिल्म इन्स्टिट्यूट ऑफ इंडिया, पुणे' यांच्या नावानेच असावी. आपल्या विनंती पत्रासोबतच २५ X १८ सें. मी. लांबी रुंदीचा स्वत:चा पत्ता लिहिलेला व ३० पैशाचे तिकीट लावलेला लखोटाही असावा. पोस्टल ऑर्डर व स्वत:चा पत्ता लिहिलेले तिकीट लावलेलं पाकीट असल्याशिवाय कोणत्याच प्रकारचा पत्रव्यवहार केला जाणार नाही. १ रुपया मनीऑर्डर किंवा चेकने पाठविल्यास तो स्वीकारला जाणार नाही.

**उमेदवाराने आपला संपूर्ण प्रवेश अर्ज माहितीपत्रकात दिलेल्या प्रमाणे ५ रुपयाच्या पोस्टल ऑर्डर समवेत १ एप्रिल १९६९ पर्यंत संस्थेच्या कचेरीत पाठवावेत.**

davp. 571 (58)/68









अनुक्रमणिका

"अगदी दिवसाढवळ्या झाला. रेडिओवरूनही सांगतायत."

"बामण ते–ते काय दिवस-रात बघणार? मारायचं म्हंजे मारायचं! त्यांना दयामाया नाय असत."

"माधवनगरालासुद्धा ब्राम्हणांना पार पिटाळले म्हणे."

"पण हे पुढे भोवेल."

"कसं काय?"

"हा नियमच आहे. मारेकऱ्यांना शस्त्राची ताकद कळली की ते ती शस्त्रं एकमेकांविरुद्ध वापरतात."

"ते पुढचं झालं. आज बामणांना पिटायस मिळतांय हे खरां!"

"ते तुम्ही केव्हाही करू शकला असता. ब्राम्हण आहेत किती? मूठभर." बोलता बोलता काका क्षणभर थांबले आणि म्हणाले,

"पण लक्षात ठेवा, मूठभर नाही चिमटीभर असले तरी ब्राम्हण डोकेबाज आहेत. ते सर्वांना पुरून उरतील!" आणि परत शांत आवाजात म्हणाले, "पण आता ह्या वैरांना काय अर्थ आहे? माधवनगराच्या ब्राम्हणांनी कुणाची हत्या केलीवती?"

"अहो काका, हां वेदांत कुणी कुणाला सांगायचा? नि सांगितला तरी ऐकणार कोण?"

"अंधारच आहे एकूण. पण मी दिवा लावीन!" काका आत्मविश्वासाने बोलले आणि एकटेच घरी निघून गेले.

काका दूरवर गेल्यावर निळू उद्‌गारला,

"जळ्ळे बामण दिवे लावनार! इथून अगुदर चालता हो तू."

सर्वांना पटलं. सगळे हंसले. फक्त मंजिनाथ तेवढा हसला नाही.

"काय म्हणतो मंजिनाथ?" काकूंनी घरी परतलेल्या काकांना विचारलं.

"खून ब्राम्हणाच्याच हातून घडलाय नि घाटावर लोक त्याचा वदला घेतायत."

"मग इकडेही तसंच होणार की काय?"

"प्रभूची इच्छा! आपण आपल्याकडून मुकाबला करायचा."

"अहो, पण आपण फक्त दोघंच आहोत. जाळतील ते आपल्याला."

"तसं होणार नाही. तू काळजी करू नकोस."

काकू स्फुंदून रडायला लागल्या. भेसूर भवितव्याच्या कल्पनेने त्यांचं तोंड कोरडं पडलं. छाती धडधडायला लागली. त्यांनी नजर गर्कन फिरवली. ती त्यांची अवस्था पाहून काका कचरले. धावत जाऊन त्यांनी केळीच्या बुंध्यात हातपाय धुतले नि दत्ताचा अंगारा काकूंना लावला.

"अग, असं काय करत्यायस ग?"

"आता आपलं काय होणार? जाळणार ते आपल्याला?"

"आपला मंजि असताना असं कधी होईल काय?"

"मग आपण त्याच्याकडे जाऊया. छाती धडधडत्याय माझी."

"म्हणून म्हणतो, अगोदर तू भीती सोड. मी सगळं काही करतो."

"पण माझी छाती धडधडत्याय हो."

"आता त्याला मी काय करू?"

"इथे दाबून धरा–इथे–इथे धडधतंय."

काकूंच्या छातीच्या कृश बरगड्यांच्या मागची रक्ताची धडधड काकांना स्पष्ट जाणवली. हे लक्षण बरं नाही हे त्यांनी तत्काळ ताडलं. मंजिनाथला बोलावून आणावा हेसुद्धा त्यांना पटलं. पण काकू इतक्या गाफील झाल्या की त्यांना तिथून निघवेचना.

"काय वेळ आली ही!" निश्वास टाकून काकू उद्‌गारल्या.

"अग, देव सारं बऱ्यासाठी करतोय. माझं ऐक तू."

"काय बरं होणाराय ह्यातून?"

"ते आत्ताच कसं सांगू. पण बरं होईल हे निश्चित."

काका धीर देत होते. बाहेर काळोख वाढत होता.

नंतर काकांच्या घरावर दगड यायला सुरुवात झाली.

"कोण आहे?" काका जोराने ओरडले. त्यावर सगळीकडे चिडीचप झालं. धावरलेल्या पाखरासारख्या काकू अंग आक्रसून निपचित पडल्या होत्या.

मग पुन्हा दगड यायला सुरुवात झाली. छपरावर, मांडवांच्या मेढींवर, झाडांवर, सगळीकडे दगड यायला लागले.

ती रात्र काका-काकूंनी प्राण मुठीत घेऊन काढली.

## [२०]

जन्मात केलं नाही ते काकांनी आता केलं; लपत छपत तुळसकरांच्या वाड्यात मागच्या बाजूनी उतरले. त्यांच्या येण्याची चाहूल कुणालाच लागली नाही. फक्त पाखरंच तेवढी जागी होती. आणि मंजिनाथाचं ओळखीचं कुत्रं काकांच्या समोर शेपटी नाचवीत आलं. त्याला थोपटत काकांनी हळूच हांक मारली, "मंजिनाथ."

एक नाही; दोन नाही. परत हाका मारल्या. शेवटी त्यांना चक्क घरातच प्रवेश करावा लागला. त्यांच्या मागोमाग कुत्रंही घरात शिरलं.

"काका? इतके सकाळीचसे?" तुळसकरांचा गडी म्हणाला.

"तसंच काम निघालंय. मंजि कुठाय?"

"राजापुरास गेले."

"केव्हा? काल तर आम्ही बोललो."

"ते खरां. पन आज ते पहिल्या कोंबड्यालाच गेले."

"कां? काही विशेष?"

"आज बाजार एकदम उतरणाराय बोलले. म्हणून खरेदीला गेले."

"केहा परतेल?"

"बरीच रक्कम घेवून गेल्यायत. म्हंजे हळदीसाठी सांगलीला जानारच."

"पण बाजारभावाचं मंजिला कसं कळलं?"

"शेटला जायचांच नव्हता. पण निळू म्हणालो, वर्साचो फायदा एक दिवसात मिलेल! म्हणून धावत गेले."

मार्गातला अडसर काढायची व्यवस्था निळूने केली आहे हे काकांनी ताडलं. "मी आलोवतो हे कुणाजवळ बोलू नकोस" अशी सूचना देऊन आल्या पावली काका परत फिरले. तुळसकरांचं कुत्रं शेपटी हालवीत त्यांच्यामागून बागडू लागलं. त्याला थोपटून काकांनी सांगितलं, 'वेड्या, तुझा सुखातला जीव तू आणखी कुठे दुःखात घालवतोस! जा–जा; धनी घरात नाही तुझा; जा, रक्षण कर त्याच्या वास्तूचं!"








तो जीव शेपटी हलवीत मागे वळला. काका आडवाटेने घरी निघाले.

सूर्याची पहिली कोवळी शेंदरी उन्हं स्वच्छ पडली होती. वारा नव्हता होता. मळ्यामधल्या गवतावरचे तुरे डुलत होते. पाखरं बागडत होती. बांधांवरची आंब्याफणसांची झाडं प्रकाशत होती. हिरव्या निळ्या डोंगरांच्या कडा स्पष्ट होत होत्या. सगळीकडे प्रसन्नता फाकत होती. दिशा उजळत होत्या.

काका घराच्या गडग्याजवळ आले आणि थक्क झाले. गडग्याला एक पांढरा कागद चिकटवलेला होता. त्यावर लिहिलं होतं :

"आज रात्री बामणाच्या घराची होळी होणार."

कागद ओरबाडून फाडायचा ? की तसाच ठेवायचा ? काकांनी तो कागद तिथे तसाच राहू दिला. ते आत गेले.

"पुन्हा माझी छाती धडधडायला लागल्याय हो !" काकूंनी कळवळून सांगितलं.

"तुझ्याच करता चाललंय नं हे सगळं ?"

"मंजि काय म्हणाला ?"

"त्याला बरं नाही."

"म्हणजे सर्वच आटपलं म्हणायचं."

"छे ! आता तर कुठे सुरवात होत्याय !"

"म्हणजे ?" काकूंनी घावरून विचारलं.

"म्हणजे आता आपलं चांगलं होणाराय."

"मग हरकत नाही."

"सुटलो आपण एकदाचे !"

"म्हणजे ?" काकूंनी पुन्हा घावरून विचारलं.

"म्हणजे आता आपलं चांगलंच होणाराय."

"मग हरकत नाही."

"नाही ना हरकत ? मग आज आपण शांत मनाने पोटभर जेवूया."

"आज असं काय म्हणताय तुम्ही ?"

"कारण आता आपलं चांगलं होणाराय."

"मग हरकत नाही."

"जेवण मात्र अगदी साधं करायचं. ताक, भात नि तोंडाला लसणीची चटणी. बस्स."

"आपले जीव वाचताहेत ना ? मग सर्व काही चांगलं लागेल."

"बरं, तू बस. मी जरा बाहेरून जाऊन येतो."

"केव्हा येणार ?"

"जास्तीत जास्त अर्धा तास. पण तूं काळजी करू नकोस."

काका खाडीकाठच्या मुसलमानांच्या वाडीत आले. हमीद जाळं विणीत बसला होता. त्याला काकांनी विचारलं,

"हमीदा, गडावर जायचंय. होडकूल काढणार ?"

"कारूं ना ! किती सीटा हात ?"

"मी नि माझी म्हातारी. दोनच."

"चार रुपे होनार."

"चालेल. टाण केव्हाचं आहे ?"

"राती साडेसाताला."

"म्हणजे पथ्यावर पडलं ! मग नक्की ठरलं ?"

"ह्या काय विचारनां झालां ?"

"आणि नाही आलास तर ?"

"असां कसां ? शब्द देला म्हंजे देला."

"मग बरोबर साडेसाताला वाट बघतो तुझी."

"पंधरा मिटा अगद्दरच येतो ना !"

"नको; काळोख पडल्यावर ये. ये मात्र जरूर हं !"

हे काम संपवून काका घरी परतले. काकू पडवीपर्यंत येऊन डोळ्यात प्राण आणून वाट पहात होत्या. त्यांनी सांगितलं,

"पोरगे एकसारखी टेहळणी करतायत वाडीची."

"मी तुला काय बजावलं की काळजी म्हणून कशी ती करायची नाही नं ?"

"हो."

"मग आत अगोदर बाजेवर पड नि विश्रांती घे. अशी काळजी करून डोकं फिरायचं एखाद्या वेळेस."

"आता तेवढंच शिल्लक राहीलंय !" काकू पुटपुटल्या आणि सरकत सरकत येऊन आपल्या बाजेवर आडव्या झाल्या.

दुपारची जेवणं झाली. काका पडवीत येऊन बसले. तरणे तरणे पोरगे यायचे, गडग्यावरचा कागद वाचायचे आणि घराचं निरीक्षण करून रेंगाळत रेंगाळत निघून जायचे. कुणीही पडवीतल्या काकांची दखल घेतली नाही. कुणालाही काकांनी हटकलं नाही. वेळ असाच रेंगाळत निघून गेला.

संध्याकाळ झाली. काकांनी काकूंना पातळ नेसवलं. त्यांच्याकडून देवाच्या पुढ्यात नारळ ठेवला. स्वतः कपडे केले.

"आता मंजिनाथाकडे जायचं ना ?" काकूंनी विचारलं.

"घरातून निघताना विचारायचं नाही."

काकू गप्प झाल्या. काकांनी त्यांना अंगारा लावला. स्वतःला लावला. मग काकूंना म्हणाले,

**यावर्षी सरकारने न दिलेल्या आणखी कांही पदव्या**

**' शंखभूषण '**

"जरा आपल्या झाडामाडांना भेटून येतो."

"काय पण करून दाखवताय ! चार दिवस तुळसकरांकडे रहायचं तर त्यासाठी जीव इतका काही वर-खाली व्हायला नको."

"पोटची पोरं मानून पोषण केलंय मी त्यांचं."

काकांनी एक उदबत्ती पेटवली आणि अंगाणातल्या पारीजाता-खाली लावून ठेवली. धुराची सुगंधी वलयं निघू लागली. हे काय चाललंय काकूंना कळेना. त्यांनी विचारलं,

"खरोखर काय करायचं ठरवलंय तुम्ही ?"

"तूर्त वास्तूचा निरोप घ्यायचा."

"साधं मंजिनाथाकडे जाताना ?"

"ऐक! आपण मुंबईला निघालोय."

"माझ्या देवा !"

"निघालोय, म्हणजे निघालोय. उद्या गडावर बोट पकडू."

"खरं म्हणता ?"

"का ? संशय वाटतो ?"

"प्राण गेला तरी ही भूमी सोडणार नाही अशी प्रतिज्ञा होती तुमची."

"ती परिस्थितीनें मोडली."

"आता आपण इथे चांगले रुळलोवतो. तशात मी ही अशी अंथरूणाला टेकलेली."

"तुझाच विचार मनात आला. कालपासून मला वाटायला लागलं की हे मला मारणार नि तुला तडफडत जीवंत ठेवणार. ते समाधान मला त्यांना देयाचं नाही."

"म्हणजे अखेर तुम्हाला माझ्यामुळे अपेश आलं."

"देवानंच ठरवलेलं असतं की हे नाटक असं-असं होणार. तसंच ते झालं."

"काय स्वर्ग मिळवलेनी आम्हाला निर्वासित करून ?"

"देवाचा ह्यामागेही हेतू असेल."

"त्यांना आमची घरं मिळावीत हाचं का नाही ?"

"नाही; निर्वासित हिंदूंचं दुःख मला चांगलं कळावं असाही त्याचा हेतू असेल."

काका पडवीत कपडे करून बसले. काकूंच्या डोळ्यांवाटे अश्रूधारा वाहात होत्या. त्या स्फुंदून स्फुंदून म्हणाल्या,

"अखेर माझंच नशीब फुटकं. माझ्यामुळेच तुम्हाला अपेश आलं."

"छे छे ! देवदयेनं भरपूर यश मिळालं मला. खूप रमलोवतो मी."

"कसलं कर्माचं यश आलंय? तुमचं नाव चालवायला मी मुलगासुद्धा दिला नाही तुम्हाला ! नि आता मुंबईला निघालो तर हे इतकं रामायण होऊन."

"देवाच्या मनासारखं झालं."

"नि अखेर इथलीच माणसं तुमच्या जीवावर उठली !"

"अग, ही एक लाट आहे. आली तशीच जाईल."

"हे दुष्टबुद्धीचे लोक इतक्या लवकर नाही जायचे."

"जातील; अगदी अवश्य जातील. कुणाच्या ना कुणाच्या तरी रूपाने परशुराम पुन्हा अवतार धारण करील ! माझी खात्री आहे, ह्या भागावर परशुरामाची सावली नेहमीच पडत राहील !"

थोड्या वेळाने काळोख उतरला. हमीद हजर झाला.

"हमीदा, चलायचं ना ?"

"होरकूल खाली बंदरात उभा हां. चला."

"जरा हिला पाठीवर घेतोस ?"

"घ्रऊंया. पन आठ आन्याचे पैसे परतील."

"देईन."

"अहो, पण मी कुठे ह्याच्या पाठीवर बसू ?"

"आता वादविवाद नाही करायचा. बसायचं."

हमीदने काकूंना पाठुंगळीस घेतलं. काका म्हणाले,

"पहा कशी मजा असते ! काही लोक पाठीशी लागतात. नि काही लोक पाठीवर घेऊन पार करतात !"

काकांनी पुन्हा एकदा घरादाराला नमस्कार केला आणि दार नीट लावून घेऊन कुणालाही चाहूल लागू न देता ती तीन माणसं काळोखाच्या आधाराने बंदराची वाट चालू लागली.

खाडीकाठ काळोखात बुडाला होता. भरतीच्या पाण्यामुळे होडी लांब गेली होती. हमीदने कंबरभर पाण्यात उतरून ती बंदराला लावली. काकांनी होडीतल्या फळकुटावर काकूंसाठी अंथरूण टाकलं. नतर काकूंना त्या दोघांनी अलगद उचलून होडीत बसवलं. पाय धुवून मग तेसुद्धा होडीत चढले.

इतक्यात बंदरावरून होडीच्या दिशेने एक कंदील दुरून जवळ जवळ येऊ लागला. काकांच्या पोटात भीतीचा गोळा उठला. ते तिकडे अवाक् नजरेने पाहू लागले. कंदील जवळ आल्यावर त्यांनी ओळखलं की त्या वाटुळकरमामी आहेत. होडीजवळ येत त्यांनी काकूंसमोर रोवळी धरली. लुगडं वर खोवून त्या गुडघाभर पाण्यात शिरल्या.

"काकू, ही भेट घ्या. रोठे आहेत."

"अहो, कशाला त्रास घेतलात इतका ?" असं म्हणून काकूंनी ती रोवळी घेतली. त्यातले रोठे काढून घेतले आणि रोवळी मामीना परत केली. त्या आल्याचं काकांना परमावधीचं आश्चर्य वाटलं. त्यांनी विचारलं,

"पण मामींना कसं कळलं आम्ही निघाल्याचं ?"

"तुम्ही सांगितलं नाही म्हणून काय कळायचं रहातंय ? ह्या होडीवाल्यान् सांगितलंन."

"अरेच्या !"

"माझा काम होतां मामींकरे. म्हनून त्यांच्याकरे वाईंच वललूं. तवां सांगितलां."

"पण काका येवढ्या घाईनंसे निघाले ?"

"कामं निघाल्यायत थोडी. ती उरकून घेतो."

"मग त्यात माझंही बारकसं काम लक्षात ठेवा."

"शकूचं म्हणता नं ?"

"हो ! दहा वरीसं झाली तिला मुंबैला जाऊन. पण अजून लग्न जुळे नाय. आता जमली पाहिजे नाय सोयरीक ?"

अनुक्रमणिका

"जमेल हो मामी."

"ते खरं. पण तुम्हीही खटपट करा थोडी. तिचं सखस्त असं कोण नाही ना तिकडे. वरं मी ही अशी ! काय करू? आणि आपल्या माणसांशिवाय काय मुंबैत लग्नं जुळतायत? खरं की नाहीं?"

"सगळं लक्षात आहे माझ्या, मामी. मी घालेन लक्ष."

"करा हां तेवढं काम माझं." नंतर दोन बोटं दाखवीत त्या म्हणाल्या, "इतके खर्चायला तयारी आहे आमची नि शिवाय मुलीच्या वडिलांनी पान तोळ्यांचा ऐवजही ठेवलाय मुलीला."

"बघू हं आम्ही. जा तुम्ही मामी," काकूंनी आगत्यपूर्वक सांगितलं. नजरेत पाणी आणून मामी परतताना म्हणाल्या,

"बरांय काकू, शकू तुमचीच लेक समजा नि खटपट करा. तुमच्या तरी हाताला यश येऊ दे."

गावाकडे परतणाऱ्या थकलेल्या वाटुळकरमामींकडे काका पहात राहिले. हमीदने ताज मारला. त्यासरशी होडी पुढे सरकली.

मुंवईच्या दिशेने काका-काकूंचा प्रवास सुरू झाला. खाडीच्या दोन्ही अंगांची झाडी झरझर मागे सरकू लागली. पाणी कापीत होडी गडाच्या दिशेने निघाली. वर निळ्याभोर आकाशात तारे लुकलुकत होते. घातलेल्या अंथरुणावर काकू आडव्या झाल्या होत्या. त्यांच्या पायावरून हात फिरवीत काका सांगत होते,

"अग, डोळे उघडून बघ तर खरी ह्या भूमीची मौज ! आताच बघून घे. पुन्हा केव्हा दर्शन घडेल देव जाणे."

काकू उठून बसल्या. त्यांच्या डोळ्यासमोरून खाडीचे काठ मागे मागे सरकत होते. पाणी उलटचा दिशेने वहात होतं. त्या म्हणाल्या,

"मला प्रभु रामचंद्राच्या वनवासाची आठवण येत्याय. त्यांनी-सुद्धा अशीच शरयू नदी ओलांडली असेल."

"अग, कुठे रामाचं वैभव ! –मात्र एका गोष्टीत नक्कीच साम्य आहे. सीतेचे गुण तुझ्यात आहेत; तू मला कधीच अंतर दिलं नाहीस."

काकूंना मोठ्यातलं मोठं शिफारसपत्र मिळाल्याचा आनंद झाला. कंठ दाटून आला आणि बसल्या बसल्या त्या काकांचे पाय चुरू लागल्या.

होडी पुढे पुढे सरकू लागली. मुंबई जवळजवळ येऊ लागली.

**[ संपूर्ण ]**

---

[ पान १० वरून–सुलोचना ]

माणसालाही कळत नाही की आपल्याला मदत कुठून होत आहे. चित्रपटात काम करताना एखादा निर्माता पैशाच्या अडचणीत आला तर बाई त्याला आपणहून मदत करतात. त्यांनी कितीतरी चित्रातून तर फुकटच कामे केली आहेत.

त्यांच्या एका चित्राला दिल्लीला ॲवॉर्ड मिळाले. या चित्रातील एका प्रमुख तंत्रज्ञालाही प्रशस्तीपत्रक होते. पण त्यावेळी तो गृहस्थ पैशाच्या फार अडचणीत होता. दिल्लीला जाण्यासाठी त्याच्याजवळ भाडयाचे पैसेही नव्हते. बाईंनी स्वतःच्या खर्चाने त्याला आपल्या-बरोबर विमानाने दिल्लीला नेले. कारण त्या माणसाने तशीच मोठी कामगिरी केली होती. त्यामुळे पैशाभावी त्याचा होणारा एवढा मोठा सन्मान चुकणे बाईंना गैर वाटले. हा मनाचा मोठेपणा नाही तर काय?

श्री. भोसले यांच्याप्रमाणेच त्यांच्या पत्नी सौ. कमलाबाई भोसले मधूनमधून सुलोचनाबाईंची गुणवैशिष्टचे सांगत होत्या. सुलोचना-बाईंना कंपनी हवी म्हणून सौ. भोसले अनक वेळा त्यांच्याबरोबर आऊटडोअर शूटिंगलाही गेलेल्या आहेत. त्याबद्दल बोलताना त्या म्हणाल्या, "एरव्ही जशी साधी सरळ रहाणी वागणूक, त्याचप्रमाणे बाहेरगावी गेल्यावरही, निर्मात्याला कसलाही त्रास द्यायचा नाही ही वृत्ती ! आपले काम बरे की आपण बरे, शूटिंग संपताच खोलीत जाऊन विश्रांती घेतील नाहीतर वाचीत बसतील कुणाच्या भानगडीत नाक खुपसणार नाहीत की नसती चर्चा करीत वेळ काढणार नाहीत. सुलोचनाबाईंचा हा अलिप्तपणा म्हणजे तुसडेपणाही नसतो. सर्वांशी सारख्याच प्रेमाने, आपलेपणाने वागून त्यांनी हिंदी निर्मात्यांमध्ये (विशेषतः मद्रासमध्ये) स्वतःचे एक आदरणीय स्थान निर्माण करून ठेवले आहे.

बाहेरगावी गेल्यावर साऱ्या गोष्टी त्या गोड मानून घेतात. 'संघर्ष'मधील एका दृष्याचे चित्रिकरण मुंबऱ्याजवळ वाळूच्या ओसाड मैदानावर व्हायचे होते. दिलीपकुमार मेकअप करूनच येणार होता. बाईंना तिथे जाऊन मेकअप करायचा होता पण त्या मैदानात ना कसला आडोसा ना एखादी जागा की जिथे त्या व्यवस्थित मेकअप करू शकतील, कपडे बदलू शकतील. अखेर निर्मात्याने काही अंतरा-वरच्या एका गलिच्छ पडक्या चाळीत त्यांची सोय केली. एक खोली कशीवशी मिळाली. सभोवार विलक्षण दुर्गंधी पसरलेली होती. मला तर तिथे पाच मिनिटेही उभे रहाणे म्हणजे शिक्षा वाटली. पण सुलोचनाबाईंनी शांतपणे त्या जागेत मेकअप केला, कपडे बदलले.

कलाकार म्हणून त्या जशा मोठ्या आहेत त्याप्रमाणेच एक गृहिणी म्हणूनही मी त्यांना फार मानते. शूटिंगच्या निमित्ताने आठन्-आठ दिवस घराबाहेर असतात पण घरातले सारे कसे टापटीप अन् व्यवस्थित असते म्हणून सांगू? आज त्यांच्यावर साऱ्या घराची जबाबदारी आहे. पण एखाद्या कर्त्या पुरुषाप्रमाणे त्यांचे घरात बारीक लक्ष असते.

• • •



## गणेश कोश

"श्री गणेश कोश मंडळ" पुणे ह्या संस्थेच्या संचालकत्वाखाली श्री. अमरेंद्र गाडगीळ यांनी एक अत्यंत मौलिक व महत्त्वपूर्ण कामगिरी पार पाडली आहे. अमरेंद्र गाडगीळ हे नाव मराठी वाचकांना तसे नवीन नाही. "मंगल साहित्य" ह्या प्रकाशन संस्थेचे संचालक म्हणून त्यांनी अनेक संस्कारक्षम पुस्तके मराठी वाचकांना दिली. भारतीय उद्‌बोधन म्हणून एक मासिकही त्याच भावनेने त्यांनी चालविले. आणि ते दोन्ही उद्योग केल्यानंतर आता ते "व्होरा आणि कंपनी'च्या बॅनरखाली कितीतरी योजनाबद्ध साहित्य सादर करीत आहेत. हे करीत असताना एक व्यापक आणि तरीही ह्या मातीत जिची मुळे घट्ट रोवली आहेत अशी एक विचारसरणी दिसून येते. कल्पकता, जिद्द आणि कल्पना कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक असलेली श्रद्धा-चिकाटी हे गुण त्यांचेजवळ आहेत. आणि ह्या गुणांच्या भरवशावरच त्यांनी गणेशकोशाचे प्रचंड कार्य हाती घेतले आणि अवघ्या वर्षात ते पूर्णही केले. 'गणेश कोश'पाहिल्यावरच प्रथमदर्शनी ह्या कार्याचे महत्तमत्व अंगी बाणते. मनात रुजते. प्रथम वंदन गणेशाला करण्याची आपली पद्धत आहे, त्याप्रमाणे ह्या कोशकार्यातले पहिले वंदनही श्री गणेशाला करण्यात अमरेंद्र गाडगीळ यानी औचित्यच साधले आहे असे म्हणता येईल. कोश म्हटला की संशोधन आले. संशोधन म्हटले की श्रम आले. श्री गणेश हे दैवत काही विशिष्ट प्रांताचे, जातीचे वा देशाचेही राहिलेले नाही. प्रस्तुत पुस्तकात इंडोनेशिया, इंडोचीन आदि देशातल्या गणेश मूर्तींची छायाचित्रेही दिली आहेत त्यावरून गणेशजी भारताबाहेरही गेलेले होते असे दिसते. तेव्हा श्रम मोठेच होते. योजनेशिवाय हे घडणे कठीण. प्रस्तुत कोशाला ही योजना होती असे दिसते.

गणेश कोशात गणेशग्रंथ, गणेशस्थाने, गणेशमूर्ती, स्तोत्रादि संग्रह, उपासना विधि-विधाने, युगायुगातील स्थित्यंतरे, संकीर्ण अशी एकूण सात प्रकरणे असून ६७० पानांच्या ह्या ग्रंथात गणेश मूर्ती-मंदिरांची १५१ छायाचित्रे, ६२ रेखाचित्रे, ३ रंगीत भद्र, ४ गणेश यंत्रे, २ नकाशे, दोनशेहून अधिक गणेश स्थानांचा परिचय, संपूण गणेशपुराण, मुद्‌गल पुराणांचा मराठी अनुवाद व गणेश-विषयक १०८ पुस्तकांचा परिचय करून देण्यात आला आहे. पुष्कळशा गोष्टी आपण परंपरेने, रूढीने करीत राहतो. परंतु त्यामागला विचार जर आपल्याला ज्ञात झाला तर त्या सर्वच व्यवहाराला एक आगळे महत्त्व प्राप्त होते. त्या कृत्यांमागचा आनंद द्विगुणित होतो. नवी दृष्टी लाभते. श्रद्धेला ज्ञानाची बैठक लाभते. विचिकित्सा बुद्धीला धार देऊन जाते. गणेशाची पूजा आपण सारीच माणसे शतकानुशतके करीत आलो आहोत. परंतु संपूर्ण गणेश पुराण कितीशा माणसांनी वाचले असेल ? वाचले असल्यास कितीशा मंडळीनी त्याचा उपयोग केला असेल. गणेशपूजा ही अग्रपूजा मानली जाते, कोठल्याही सण-समारंभाच्या प्रसंगी गणेशपूजन सर्वप्रथम होते. पण ते कां होते याची उत्तरे साऱ्यांना ठाऊक असतातच असे नाही. हे सारे अन्वयार्थ जेव्हा स्पष्ट होत जातात तेव्हा भ्रम नाहीसे होतात. ज्ञान कक्षा विस्तारते. 'गणेशकोश' ह्या दृष्टीने एक अत्यंत मौलिक काम करतो. कोशात भाष्यापेक्षा तपशील-संशोधनाला महत्त्व असते. त्यादृष्टीने हा कोश हा एक उत्तम कोश म्हणता येईल. गणेशाची शे-दीडशे छायाचित्रे पहात असताना गणेशाच्या पूजेचा विस्तार जावा, सुमात्रा, वाली, इंडोनेशिया आदि देशातही झालेला होता हे पाहून मन प्रसन्न होते. गणेशाच्या आकृती, पोषाख आदि तपशीलही मनोज्ञ वाटतो. अष्ट विनायकांची चित्रे व कथाही नवीनाना काही प्रेरणा देऊन जाते. गणेश स्थानांचा तपशीलवार परिचय व नकाशे हेही खूपच उपयुक्त ठरतील असेच आहेत. गणेशमूर्तींच्या संदर्भात दिलेली रेखाचित्रे खूपच नवीन माहिती देऊन जातात. गणेशाची शस्त्रे व गणेशप्रिय वस्तूंचे स्वतंत्र रेखाटन पुस्तकात आहे. तर मूर्तींच्या छायाचित्रात सिंहली पाषाण प्रतिमा, कंबोडियन पंचरसी, इंडोचायना चतुर्मुखी, ब्रिटिश म्युझियममधील मूर्ती, नहर-संग्रह धातू मूर्ती, वालीफ्यूडो, चिनीमूर्ती, दि आंगच्या पठारावरील मूर्ती यांचा समावेश आहे. जावा, नेपाळ, तिबेट, इंडोचायना, ब्रम्हदेश, बोर्निओ, हॅनोई, इत्यादि ठिकाणचे गणपतीही पुस्तकात भेटतात. गणेश स्तोत्रे दिली आहेत. त्यात गणेश गीतेपासून आरत्या, पदे आणि शंकराचार्यादिकांची वैय्यक्तिक स्तोत्रेही देण्यात आली आहेत. ह्या सर्वापेक्षा एक महत्त्वाचे प्रकरण यात आहे ते मला सर्वात महत्त्वाचे वाटते. 'गणेश पूजे'बावत युगायुगातून स्थित्यंतरे होत गेली आहेत. त्या सर्व स्थित्यंतरांची माहिती देण्यात आली असून त्यासंबंधीची विचिकित्साही तज्ञ अभ्यासकांनी केली आहे. त्यादृष्टीने हा ग्रंथ केवळ 'श्रद्धाविषय' राहिलेला नाही. तर त्याचे आधुनिक विचारवंतांना एक नवे खाद्यही पुरविले आहे. त्या प्रकरणातील काहींची शीर्षकेच बरेचसे काही सुचवून जातील. वेदपुराणकालीन गणपती, मराठेशाहीतील गणेशदर्शन, आधुनिक गणेश, गाणपत्यातील पंथोपपंथ इत्यादि.ह्या विभागात प्रा. (डॉ.) सी. ग. देसाई, प्र. न. केळकर, ना. स. करंदीकर इत्यादीनी लेखन केले आहे. ही नावे अपेक्षा वाढवितात व पूर्णही करतात असे म्हणता येईल. पुस्तकाचे मुखपृष्ठ व सोबतची गणेश दिनदर्शिका हे ह्या पुस्तकाचे जादा आकर्षण ठरावे.

पुस्तकाचे मोल पैशांनी करता येण्यासारखे नाही. अशा श्रमांना 'मोल' हे पडतेच. त्याचे मोल मात्र आपण पैशांनी केले पाहिजे (तरच अशा प्रयत्नांना योग्य

अनुक्रमणिका

ती दाद मिळेल) एक कल्पना सुचते ती अशी की श्री गणेशाप्रमाणेच शिव, पांडुरंग, दत्तात्रेय, विष्णु, कृष्ण, राम आदि दैवतां-बाबतही असे संशोधनपर कोश निघणे अगत्याचे आहे. ही दैवते आसेतुहिमाचल पूजिली जात असल्याने कोशाला भरपूर खाद्य मिळू शकेल. पुन्हा एकदा संपादक श्री. अमरेंद्र गाडगीळ यांचे अभिनंदन करतो.

— प्रभाकर अत्रे

(**गणेशकोश**–पृष्ठे ६७०, मूल्य रु. ३० संपादक–**अमरेंद्र गाडगीळ**. गणेश कोश मंडळ, पुणे करिता. प्रकाशक – अमरेंद्र गाडगीळ. व्होरा अ‍ॅण्ड कं. पब्लिशर्स प्रा. लिमिटेड, मुंबई २.)

# रजत महोत्सवी वर्षानिमित्त वाचकांसाठी खास योजना

'दीपावली'च्या वाचकांसाठी एक खास योजना आम्ही येथे जाहीर करीत आहोत. या योजनेत भाग घेऊन आमच्या वाचकांना 'दीपावली'च्या रजत महोत्सवात सहभागी होण्याचे आवाहन करीत आहोत.

रजत-महोत्सवी वर्षात प्रसिद्ध होणाऱ्या म्हणजे मार्च १९६९ या अंकापासून फेब्रुवारी १९७० पर्यंतच्या अंकापर्यंत दर महिन्याला एक कूपन प्रसिद्ध करण्यात येईल. त्या त्या महिन्यातील दर्जेदार साहित्य कोणते (कादंबऱ्या सोडून) हे वाचकांनी आपल्या पसंतीनुरूप त्या महिन्यातील प्रसिद्ध झालेल्या कूपनावरच नमूद करून ते कूपन आमच्याकडे पाठवावयाचे आहे. या कूपनामधून सर्वात अधिक मते ज्या लेखकाच्या साहित्याला पडतील त्याला 'दीपावली'कडून त्या त्या विषयाचे 'रौप्यपदक' देण्यात येईल.

शिवाय 'दीपावली'कडे भरून आलेल्या कूपनातून पंचवीस कूपने लॉटपद्धतीने काढण्यात येतील आणि त्यांना एक वर्षपर्यंत 'दीपावली'चे अंक भट म्हणून पाठविण्यात येईल. याशिवाय काही भाग्यवान स्पर्धकांना रोख पारितोषिकेही देण्यात येतील. (त्याबाबतचा तपशील नंतर जाहीर होईल.)

या योजनेत भाग घेणाराना खाली नमूद केलेले नियम बंधनकारक राहतील :

----- येथे कापा ----- येथे कापा ----- येथे कापा ----- येथे कापा

## या अंकातील दर्जेदार साहित्य

### खास योजनेचे कूपन

१. **सर्वोत्तम कथा:**

२. **सर्वोत्तम लेख:**
(विनोदी, ललित इत्यादि):

३. **सर्वोत्कृष्ट कविता:**

४. **अन्य साहित्य:**
(वैचारिक लेख, प्रवासवर्णन इ.)

येथे कापा

कूपन पाठविणाराचे नाव ________________

संपूर्ण पत्ता ________________

________________

येथे कापा

या योजनेबाबतच्या सर्व अटी मला मान्य आहेत

'दीपावली' * १९७०

________________

स्वाक्षरी

----- येथे कापा ----- येथे कापा ----- येथे कापा ----- येथे कापा

१. दर महिन्याच्या अंकात प्रसिद्ध होणाऱ्या कूपनवरच आपले मत नमूद करून ते (फेब्रुवारी १९७० अखेर-पर्यंत केव्हाही) आमच्याकडे पाठविले पाहिजे.

२. बाराही महिन्यांची कूपने एकत्र करून त्यातून एकंदर पंचवीस कूपने लॉटने काढ-ण्यात येतील.

३. एका स्पर्धकाला एकाच कूपनाचे पारितोषिक मिळेल.

४. या योजनेचा अंतिम निर्णय पुढील वर्षाच्या वर्षारंभ अंकातून (मार्च १९७० च्या अंकात) प्रसिद्ध होईल आणि तो सर्व स्पर्धकांना बंधन-कारक राहील.

५. एका व्यक्तीला कितीही कूपने भरून पाठविता येतील. मात्र ती कूपने 'दीपावली'तूनच प्रसिद्ध झालेली असली पाहिजेत.

कूपन पाठविण्याचा पत्ता: संपादक 'दीपावली', दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई-४.

* येथे त्या त्या महिन्याचे नाव छापावे.












## सुवर्णमहोत्सवी नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष
## श्री. ग. दि. माडगूळकर

'महाराष्ट्राचे वाल्मीकि' म्हणून ग. दि. माडगूळकर यांना सारेच संबोधतात. ते नाव वा संबोधन सार्थच आहे. पण तसे संबोधण्यात माडगुळकरांच्या साऱ्या व्यक्तित्वाचा परिचय होत नाही. कारण माडगुळकरांच्या प्रतिभेचे उत्तुंग आणि उत्फुल्ल दर्शन 'गीतरामायणा'त झालेले असले तरीही ते तेथेच सीमित होते असे नाही. गीतरामायण हा तर त्यांच्या प्रतिभेच्या शिरपेचातला मानाचा तुरा आहे. पण खरं सांगायचं तर तो एक तुरा आहे. असे अनेक मानाचे तुरे खोवावेत व शारदेच्या दरबारात त्यांना 'मानाचं पान' द्यावं असंच कर्तुक त्यांनी गाजवलं आहे. माडगुळकर हे मराठी शारदेचं बहुगुणी लेणं आहे. कवित्व हा त्याचा एक पैलू आहे, येवढच फार तर म्हणता येईल. माडगुळकर हे नाव घरोघरी गेलं ते त्यांच्या 'पटकथा-संवाद–गीते' (आणि क्वचित भूमिकाही) माडगुळकर या 'प्रयोग' प्रयत्नातून! एक काळ असा होता की ग. दि. मा. हे त्या क्षेत्रातले अगदी अनभिषिक्त राजे होते. वरील उल्लेख असल्याशिवाय मराठी चित्रपटाच्या टायटल्सची पाने उलटली जाऊ शकत नसत. माडगुळकरांचा चित्रपट प्रवेश हा खूप जुना. विनायक हा त्यांचा ह्या विषयातला स्नेही–मार्गदर्शक. चित्रपट व्यवसायात त्यांनी प्रवेश केला तो एक हरहुन्नरी माणूस म्हणून. अनेक लहान मोठ्या भूमिका त्यांनी पडद्यावर व पडद्यामागे केल्या. आणि चित्रपट कथा लेखक–सहाय्यक दिग्दर्शक म्हणून काम केले. माडगुळकर हे मनाने कवि आणि स्वभावाने नट आहेत. गोष्टीवेल्हाळ कथेकरी ( पिंड तसा कीर्तनकाराचाच ) आहेत. उत्तम नकलाकार आहेत. बैठकी रंगवणारे फडकरी आहेत. शीघ्र–कवि आहेत. सहजसुलभ रचना व स्वतंत्र कल्पनांनी युक्त अशा शेकडो गीतांचे गीतकार आहेत. रसाळ कथाकार आहेत. 'साहित्यकले'वर त्यांची असीम श्रद्धा आहे. 'मऱ्हाठी' मातीच्या गुणांची त्यांना योग्य जाण आहे. तिचा त्यांना अभिमानही आहे. तसा हा माणदेशी माणूस अस्सल भारतीय आहे. आणि आपण भारतीय आहोत ह्यात तो गौरवही मानतो. हाडाचा प्रेमळ, मनाचा मऊ असलेला हा माणूस प्रसंगी वज्रकठोरही होऊ शकतो. मग त्यांच्या वाणीला एक आगळेच तेज चढते. 'श्रद्धेय' जपताना उगाचच पुरोगामी - प्रतिगामित्वाची चर्चा ते करीत बसणार नाहीत. आपल्याला आपलेच म्हणतील. आणि तितक्याच रोखठोकपणे परक्याला परकं म्हणतील. माडगुळकर मंडळी ही काहीसं प्रतिभेचं आणि तेजाचं लेणं लेऊनच आली आहेत असं म्हणता येईल. १९४२ च्या चळवळीत अण्णांनी नुसती शेरशायरीच केली नाही. चळवळीत यथाशक्ति सक्रिय भाग घेतला. कलांचे आणि जीवनाचे काही एक अनन्यसाधारण नाते आहे, असलेच पाहिजे अशी मनोमन श्रद्धा बाळगणारे जे कुणी कलाकार–साहित्यिक महाराष्ट्रात आहेत त्यात माडगुळकर अण्णांचा समावेश होतो. ही श्रद्धा बाळगून माडगुळकरांनी कथा–कविता–गीते–चित्रपट कथा–पटकथा–संवाद, वग–राष्ट्रीय गीते–नाटक–प्रवास–आत्मकथा इत्यादि अनेक माध्यमातून कलात्म जीवनविचार मांडला आहे. त्यांनी लिहिलेल्या काही व्यक्तिरेखाही अशाच साहित्यात अमर राहतील. "गीतरामायणा"ची निर्मिती तर श्री गणेश व श्रीशारदा ह्या दैवतांची संपूर्ण कृपा असल्याशिवाय झालेली नाही. गीतरामायण हे नुसते काव्य नाही. काव्य, तत्वज्ञान, रसवत्ता, कल्पकता, उदात्तता, आणि संस्कृति दर्शन, श्रेष्ठतम राज्याचा जयजयकार इत्यादि अनेक सुरेख गोष्टींचा संगम आहे. म्हणूनच मुलापासून म्हाताऱ्यांपर्यंत तो वारसा घरोघर पोचवला आहे. अनुकरणेही झाली. पण अजूनही 'अस्सला'ला धक्का लावणे कुणालाही जमलेले नाही ह्यातच अण्णांच्या प्रतिभेचा जयजयकार होतो आहे असे मला वाटते. गीतरामायणापूर्वी त्यांनी अनेक दीर्घ कथाकाव्ये मराठी वाचकांना सादर केली होती. अभंग–ओवीचेही तिला प्रेम आहे आणि लावणी, गझलाचेही वावडे नाही. ती 'जोगिया'ही लिहिते आणि 'जिंकू किंवा मरू' वा 'दैवजात दुःखे भरता' सारखे गाणेही सहजतेने लिहून जाते. असे हे बहुरुपी व बहुगुणी माडगुळकर ग्वाल्हेर येथे भरणाऱ्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष झाले आहेत. माडगुळकरांची साहित्य–तपश्चर्या तशी मोठी असली तरी नाट्यतपस्या कमी आहे. पण नाटके लिहिली नसली तरी भरपूर नाट्य पाहिले, अनुभवलेले असल्याने व चित्रपट माध्यमाचेही तसे 'नाटकी' जगाशीच नाते असल्याने त्या स्थानाला ते योग्य न्याय देतील, असा विश्वास वाटतो. अभिनंदन ! !

* *

## नवे कलासंचालक
# माधव सातवळेकर

कलेच्या क्षेत्रात पितापुत्रानी एकाच क्षेत्रात सारखाच विक्रम करून दाखविल्याची व पुत्राने तोच वारसा पुढे चालविल्याची, वाढविल्याची व स्वतंत्रपणे मुलुखगिरी करून नामवंत होण्याची उदाहरणे तशी कमीच आढळतात. पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर हे नाव आज महाराष्ट्रात 'वेद महर्षी' म्हणून सुपरिचित असले तरीही कलेच्या प्रांगणात मात्र कीर्तिवंत चित्रकार म्हणून ओळखले जाते. पंडितजीनी आपल्या आयुष्यात अनेक गोष्टी केल्या. स्वातंत्र्य लढ्यातही त्यांनी भाग घेतला, चित्रेही काढली, पदके पारितोषिके मिळवली आणि उत्तर आयुष्यात वेदांचे संशोधन, अभ्यास केला व हजारो पाने भरतील अशी साहित्यनिर्मिती केली. पंडितजींचा चित्रकलेचा वारसा घेऊन श्री. माधव सातवळेकर कलेच्या क्षेत्रात उतरले. त्यांचे मार्गदर्शन प्रारंभी त्यांनी घेतले. नंतर जे. जे. स्कूल ऑफ आर्टमध्ये दाखल झाले. आणि अवघ्या दीड वर्षात पेंटिंगचा अवघा अभ्यासक्रम पूर्ण करून त्यांनी डिप्लोमा घेतला. आणि मेयो पदक पटकावले. ह्या बाबत एक वैशिष्टय सांगता येण्यासारखे आहे. ५० वर्षांपूर्वी त्यांच्या पिताजीनी हेच पदक पटकावले होते. कलेच्या क्षेत्रातला एक अपूर्व योग म्हणून ह्याचा उल्लेख करता येईल. मुंबईचा अभ्यासक्रम पूर्ण करून ते विलायतेला गेले आणि लंडन येथील प्रसिद्ध स्लेड कलाविद्यालयात त्यानी एक वर्षभर शिक्षण घेतले. 'स्टुडिओ' ह्या कलाविषयक नियतकालिकात त्यांचे एक पानभर चित्र प्रसिद्ध करण्यात आले होते. नंतर ते म्युनिकला गेले आणि तेथील आर्ट गॅलरीत ते काही काळ निरीक्षण आणि निर्मितीत दंग राहिले. त्यानंतर ते फ्लॉरेन्स येथे गेले आणि प्रा. वॅस्टियानिनी यांचे खाजगी मार्गदर्शन त्यांनी मिळविले. १९४० साली ते पॅरिसला गेले आणि महायुद्धाच्या धामधुमीत कसेबसे भारतात परत आले. १९४५ साली त्यांच्या चित्रांचे पहिले प्रदर्शन भरले. कला समीक्षकांनी एकमुखाने त्यांच्या कलेचे कौतुक केले. अलिकडेच त्यांच्या चित्रांचे एक प्रदर्शन जहांगीर आर्ट गॅलरीत भरले होते. आणि अवघ्या दोन तीन दिवसातच त्यांच्या ३०/३५ चित्रांपैकी तीन चतुर्थांश चित्रे विकली गेली होती. माधव सातवळेकर हे नाव कलेच्या क्षेत्रातला परवलीचा शब्द कसा आहे ह्याचा प्रत्यय त्यावेळी आला. त्या प्रदर्शनातही 'पोर्ट्रेट' हे त्याचे खास वैशिष्टय उठून दिसत होते. तसेच पांढऱ्या रंगाचा वैशिष्टयपूर्ण व कलापूर्ण वापर करून त्यांनी काही चित्रे सादर केली होती. खूपच विविध विषयांवरची चित्रे त्या प्रदर्शनात होती. सातवळेकरानी पूर्व आफ्रिकेचा दौरा केला. तेव्हा तेथील हाय कमिशनर अप्पासाहेब पंत यांनी त्यांना सहा चित्रप्रदर्शने भरविण्यास सर्व प्रकारचे सहाय्य केले. नैरोबीच्या गव्हर्नरांना सातवळेकर यांची चित्रे फार आवडली. त्यांनी काही चित्रे विकतही घेतली. आफ्रिकन लोकजीवनाचे काही मनोज्ञ आलेख सातवळेकर यांनी रेखाटले. व्हॅन गॉ, गो गॅं, देगास, स्टॅन्ले स्पेन्सर, हेन्री मूर ह्या पाश्चात्य नामवंतांच्या कलेचा प्रत्यय देण्याचे सामर्थ्य माधवरावांच्या कलेत आहे. म्हणूनच मी वर म्हटले आहे की 'माधव सातवळेकर'



**श्री. माधव सातवळेकर**

हा कलेच्या क्षेत्रातील परवलीचा शब्द झालेला आहे. गेली १५ वर्षे ते कला शिक्षणाचे कार्य करीत होते. बॉम्बे आर्ट सोसायटीचे ते अध्यक्षही होते. सातवळेकरांना प्रसन्न व स्थिरप्रज्ञ असे व्यक्तित्व लाभले आहे. अलिकडे रुपेरी ध्वजा दिसू लागली असली तरी मूळचे ते देखणे कलाकार आहेत. बोलणे, वागणे, हसणे शालीनतेचे व सुसंस्कृततेचे निदर्शक! कलेतल्या यशाने त्यांच्यात अहंकाराचा वारा शिरलेला नाही. कलेबाबतचा आत्मविश्वास मात्र त्यांच्या डोळ्यातही दिसतो. सहवासात जाणवतो. अशा ह्या दिगंतकीर्त कलाकाराला कला संचालक नेमून महाराष्ट्र शासनाने आपली गुणग्राहकता दाखविली आहे. म्हणून माधवरावजींचे अभिनंदन करताना मी महाराष्ट्र शासनाचेही अभिनंदन करतो.

## "तेजाचे बाळ"
# मोहन रानडे

मंगल पांडे, नानासाहेब पेशवे, तात्या टोपे, झाशीची राणी, कुवरसिंह, वासुदेव बळवंत, चाफेकर बंधु, सावरकर, धिंग्रा, हरदयाळ, परमानंद, खुदीराम बोस, बटुकेश्वर दत्त, भगतसिंग, उधमसिंगापासून ते सुभाषचंद्र राशबिहारीपर्यंतच्या सशस्त्र क्रांतिकारकांच्या तेजस्वी परंपरेतला अलिकडच्या काळातला एक थोर सुपुत्र तेरा वर्षांनी पोर्तुगीजांच्या भीषण अशा कारावासातून मुक्त होऊन मायदेशी परत आला आहे. तेजाचे बाळ तेजाच्या विशाल सागरात येऊन मिळाले आहे. साध्य साधन विवेकाच्या वांझोटचा चर्चा करीत बसण्यापेक्षा मायभूमीची मुक्ती हेच साध्य मनोमन जपत, त्यासाठी जे जे जवळ असेल त्याचे समर्पण करण्यासाठी बद्धपरिकर झालेल्या तरुणांच्या मेळाव्याचा मुकुटमणी शोभेल असा हा तेजस्वी सुपुत्र! मोहन रानडे हे त्याचं क्रांति प्रयत्नातलं स्वीकृत नाव. खरं तर तो मनोहर विष्णु आपटे! सशस्त्र क्रांतीची वाटचाल नेहमी खोटी नावे, (लौकिक दृष्टया) खोटे मार्ग, खोटी भाषा, खोटया दाढया अन् खोटे मुखवटे, खोटी परिभाषा अन् खोटे रिमत ह्यातूनच होत असते असा योग दिसतो. अंतिम सत्याची, मुक्तीची वाट असत्यातून असावी हा एक विचित्रच पण अपरिहार्य योग म्हणावा लागेल. मनोहर आपटे हा आपटे राहिला नाही. कारण अंतिम मुक्तीसाठी निघालेला तो यात्रिक होता. यात्रिकाला







नावासकट 'लौकिका'चा त्याग करता यावाच लागतो. सत्कार गोळीवारांचे मिळतात. प्रसंगी मृत्यूशी खेळीमेळी करावी लागते. पण हे साधक मृत्यूच्या दिव्यावर झेपावणारे पतंगच असतात. स्वतः जाळून घेतात अन् तेजाचा वारसा जिवंत ठेवतात. मरगळलेल्या तरुण मनांना म्हणूनच मोहन रानडे यांचे आकर्षण वाटले आणि हजारो तरुण पहाट, थंडीची पर्वा न करता मोहनचा जयजयकार करण्यासाठी विमानतळावर जमले. त्या सोहळ्याचे वर्णन शब्दातीत. माता आणि भारतमाता धन्य झाली असा तो सोहळा—केवळ अलौकिक !! मोहन रानडे ही इतकी वर्षे एक 'दंतकथा' होती. एक फेब्रुवारी १९६९ ह्या दिवशी भारतीय जनतेच्या दृष्टीने ती एक 'सत्य' कथा झाली आहे. 'सव्वीस वर्षे सश्रम कारावास' भोगून हा भारतीय क्रांतिवीर परत आला असता तर १९८१ साल उजाडले असते. पण मातेची उत्कट श्रद्धा आणि भारतीय जनतेचे सातत्याचे प्रयत्न यातून रानडे २६ जानेवारी १९६९ ला मुक्त झाले.

सांगलीच्या आपटे घराण्यातला हा मनोहर. वडील फारच लहानपणी वारले. आई-आजीने त्याला वाढवले. वडील फारच लवकर वारले म्हणून 'अपशकुनी' मुलगा म्हणूनही काहीनी संबोधलेला. पण संस्कार मात्र तेजाचे घेतले. देशभक्तीचे घेतले. "तुझे तेज अंगी शतांशे जरीही। उजाळून देऊ दिशा दाहि दाही" हे नुसते गाणे नव्हते. ती मनोमन ठसलेली प्रतिज्ञा होती. म्हणून हैद्राबादच्या रझाकारांच्या 'बंदोबस्ता'ला मोहन धावला. 'नगरहवेली'च्या मुक्तिसंग्रामात भाग घेणाऱ्या महाराष्ट्रीय तरुणात सुधीर फडके आदि मंडळींबरोबर तोही होता. पुढे खुद्द गोव्यातला हा 'रानडे गुरुजी' गोव्याच्या मुक्तीसाठी जे क्रांति प्रयत्न झाले त्यात सामील झाला व "बेती"वरच्या सशस्त्र हल्ल्यात चार गोळ्या लागून जखमी झाला. त्यावर त्याने जी धीरोदात्तता दाखविली ती त्याचे वेगळेपण सिद्ध करते. त्याने सहकाऱ्यांना शस्त्रे वगैरे घेऊन पळून जायला सांगितले. व्यक्तीपेक्षा कार्य मोठे ही श्रद्धा बाणलेली असल्यानेच हे घडले. त्याच्या 'स्फोटक' व्यक्तित्वामुळेच गोवा सरकारने त्याच्या अटकेसाठी १०,०००चे बक्षीस लावले असले पाहिजे. २९ डिसेंबर १९५६ ला त्याला २६ वर्षांची शिक्षा झाली. त्या काळात वेड्या, एकलकोंडी, अंधार कोठडी, मारहाण, कदान्न देणे इत्यादि सर्व प्रकारचा छळ सोसूनही मोहनचे 'मोराल' बिघडले नाही. शरीराची कांब वाकली नाही. डोळ्यातले तेज निमाले नाही. जिद्द मेली नाही. सेवाभाव संपला नाही. सत्कार वगैरे विषयक संकोच सरला नाही. ध्येयवादी रग त्याला सोडून गेली नाही हे त्याच्या मुक्तीनंतर त्याने जी भाषणे केली, ज्या गप्पा मारल्या, जे संकल्प प्रगट केले त्यावरून दिसते. त्याच्या विजनवासाची कथा वाचत, ऐकत असताना मनात एक विचार येत होता. सर्वच सशस्त्र क्रांतिकारकांच्या विजनवासाची कथा ही अशीच असते. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या आयुष्यातल्या अन् मोहनच्या आयुष्यातल्या काही घटनात विलक्षण साम्य आहे. सेनापती हा प्रथम उत्तम सैनिक असावा लागतो. "मी तसाच एक सैनिक आहे" ही भूमिका मोहनने स्पष्ट केली आहे. ह्यातच त्याच्या वृत्तीतली शालीनता व समर्पण भावना स्पष्ट दिसते. असा हा तेजाचा सुपुत्र पुन्हा आपल्यात आला आहे. त्याच्या पुढील कार्यक्रमाची चिंता मला नाही. त्याने काही काळ विश्रांती घ्यावी, अभ्यास करावा, वाचन करावे असे सुचवीन. कारण त्याने यातना खूप भोगल्या आहेत. आज ही गरज आहे. मोहन रानडे यांचे अभिनंदन !!

—आदित्य

## नांदा सौख्यभरे



**मुंबई उपनगरातील कार्यकर्ते व अशोक प्रिंटिंग प्रेसचे मालक श्री. अण्णासाहेब सावंत यांचे पुत्र चि. रविंद्र यांचा विवाह चि. सौ. कां. शैला यांच्याबरोबर मोठ्या थाटाने पार पडला. वधूवराना शुभाशीर्वाद देण्यासाठी डॉ. मंडलीक, डॉ. कलगुटकर आणि उपनगरातील अनेक कार्यकर्ते इत्यादी मंडळी उपस्थित होती.**

## 'हवाई सुंदरी'ना आवाहन

अमेरिका-रशिया आवकाशयानातून चंद्राकडे झेप घेत असले तरी भारतात अद्यापि विमानोड्डाणाबद्दल बरेच कुतुहल आहे. त्यासाठी 'माझे पहिले हवाईभ्रमण' यावर हवाई सुंदरीनी आपले अनुभव लिहून पाठविल्यास 'दीपावली'च्या 'वायुसेना विशेषांका'त (मे १९६९) त्याना प्रसिद्धी मिळेल. शब्द मर्यादा एक हजार : अखेरची तारीख २० मार्च १९६९.











## 'मारात–साद'

सेंट झेवियर कॉलेजच्या सभागृहात एरवी जेथे प्रेक्षकांसाठी खुर्च्या ठेवलेल्या असतात तिथे पुरुषभर उंचीचा एक विस्तीर्ण मंच उभारण्यात आलेला आहे. मंचावर चढून जाण्यासाठी एका बाजूला कलता लाकडी रस्ता आहे. मंचावर एक गिलोटिन ठेवलेले आहे.

'गिलोटिन' हा काय प्रकार असतो हे फ्रेंच राज्यक्रान्तीचा इतिहास वाचलेल्यांना–अगर केवळ शब्दकोशातच तो शब्द धुंडाळून पाहिलेल्यांना–परिचित असेल. एखाद्या दरवाज्यासारखी उभी चौकट; तिच्या डोईला एक धारदार तिरके पाते टांगलेले. चौकटीच्या खालच्या अंगाला डोके ठेवायचे. मग कोणीतरी दोरी ओढतो. पाते खट्‌दिशी खाली येते. क्षणार्धात मुंडके धडावेगळे होते !

त्या रात्री सेंट झेवियर कॉलेजच्या सभागृहात उभारलेल्या मंचावर असेच एक मुंडके धडावेगळे करण्यात आले ! सुटाबुटात हा प्रकार पहायला आलेल्या मुंबईकर प्रेक्षकांच्या उपस्थितीत !

प्रकार नाटकातला होता हे चाणाक्ष वाचकांनी ओळखले असेलच ! पण नाटकात झाले तरी असला प्रकार करण्याची प्रथा नाही ! थिएटर ग्रूपने केलेल्या नाटचप्रयोगात हा शिरच्छेद इतका हुबेहूब वठविण्यात आला होता की लेच्यापेच्या प्रेक्षकाचे काळीज मिनिटभर थरथरत राहावे ! प्रकाशझोतांची बेमालूम उघडमीट, छुप्या झडपेतून प्रेक्षकांना नकळत वर येणारे 'मुंडके' आणि गिलोटिनच्या खाली पडणाऱ्या पात्याचा केवळ आवाज करून निर्माण केलेला प्रत्यक्षाचा आभास–ह्या प्रकरणामागील तांत्रिक जादूगिरीशी आपल्याला कर्तव्य नाही . .



—ज्ञानेश्वर नाडकर्णी

नाटकाचे नाव . . पण थांबा, ते लिहिण्यापूर्वी किंचित् श्वास घेतला पाहिजे . "मार्क्वी द सादच्या दिग्दर्शनाखाली शॅरेन्टनच्या इस्पितळातील वेडयांनी केलेले मारातच्या छळाचे आणि खुनाचे नाटक." मारात हा फ्रेंच राज्यक्रान्तीचा एक पुढारी. राज्यक्रान्तीचे मूळ हेतू बाजूला राहून काही संधिसाधू लोक या काळात गब्बर झाले. अत्यंत निर्घृण अशा हत्याकांडाच्या प्रक्षोभक ज्वाला तशाच धुमसत राहिल्या. हेकेखोर राजाच्या राजवटीत पिळून निघालेल्या गोरगरीब जनतेचे नशीब काही उघडले नाही. हा प्रकार पाहून मारात अतिशय अस्वस्थ होऊन गेला. प्रकृतिअस्वास्थ्याला तोंड देत या प्रतिक्रान्तीच्या ओहोटीची लाट थोपवून धरण्याचा तो प्रयत्न करू लागला. दुर्दैवाने राज्यक्रान्तीच्या या विचित्र परिणतीमुळे प्रक्षुब्ध झालेल्या शारलेत् कॉर्डे नावाच्या तरुणीने त्याच्या घरी येऊन खंजीर छातीत खुपसून त्याचा वध केला.



'मारात–साद'मध्ये अलिक पदमसी व जर्सन दा कुन्हा

मार्क्वी द साद हा एक तत्कालीन सरदार. सुप्रसिद्ध लेखक. "सॅडिझम" या विकृत भोगवादी प्रणालीचा प्रणेता. द सादच्या आयुष्याची अखेरची वर्षे–फ्रेंच राज्यक्रान्तीनंतरची वर्षे–शॅरेन्टन येथील वेडयांच्या इस्पितळात गेली. आता फ्रान्समध्ये नेपोलियनचे राज्य आलेले होते. इस्पितळाचा प्रमुख कुल्मिए हा स्वतःला प्रागतिक मताचा समजे, आणि म्हणून अधूनमधून आपल्या ताब्यातील वेडयांना तो एखादुसऱ्या नाटकाचा प्रयोग करू देई. त्यामुळे त्यांच्या मनाचे आरोग्य सुधारेल असे त्याचे म्हणणे! अशी नाटके लिहून ती सादर करण्याची द सादला हौस होती. पॅरिसहून मोठमोठी मंडळी सहकुटुंब ही वेडयांनी बसविलेली नाटके पाहायला येत.

जणू काही द सादने बसविलेलेच एखादे नाटक शॅरेन्टनचे वेडे तत्कालीन पद्धतीने सादर करीत आहेत अशी कल्पना करून पिटर वाइसने आपले (मूळ फ्रेंच) नाटक लिहिले. म्हणजे थिएटर ग्रूपतर्फे झाला तो एका नाटचप्रयोगाचा नाटचप्रयोग. प्रेक्षकांना सुमारे दीडशे वर्षापूर्वीच्या कालाची आणि परिस्थितीची प्रचीती यावी म्हणून दिग्दर्शक अलीक पदमसी यानी काही विशिष्ट तपशील वापरला होता. प्रेक्षकांना जागा दाखविणाऱ्या 'इस्पितळातील रक्षकां'चा वापर प्रत्यक्ष नाटकातही वेडया 'नटां'ना आवरण्यासाठी होई. प्रेक्षागृहात विजेच्या दिव्यांऐवजी मेणबत्त्या लावलेल्या होत्या. प्रयोग सुरू झाल्यावर रक्षकांनी येऊन त्या विझविल्या, आणि मध्यंतराच्या वेळी पुन्हा लावल्या !

वाइसच्या नाटकात छोटे छोटे प्रवेश आहेत, आणि एखादा 'टॅब्लो' केल्याप्रमाणे ते केले जातात. मारातचे काम करणारा वेडा सतत मुख्य मंचावरील एका तत्कालीन स्नानपेटिकेत बसलेला असतो. (हे काम स्वतः पदमसीनी केले होते.) त्याच्या अंगाला भयंकर खाज येत असल्यामुळे त्याची एक सेविका सतत त्या पेटिकेत थंड पाणी ओतीत असते. आणि पेटिकेत बसून, दौत-लेखणी घेऊन, झपाटल्यासारखा मारात आपली भाषणे आणि जाहीरनामे खरडत असतो.

मंचावरच एका कोपऱ्यात स्वतः मार्क्वी द साद हासुद्धा बसलेला असतो. एखाद्या सरदाराच्या थाटात, ग्रंथ वाचनात गढून गेल्याचे ढोंग करीत. वाइसचे नाटक जरी मुळात द सादने लिहिलेले आहे अशी कल्पना आहे तरी खुद्द द साद हे त्या नाटकातलेच एक पात्र आहे. अधूनमधून तो मारातशी वाद घालतो. त्या दोघोंच्या भिन्न मतप्रणालींच्या अनुषंगाने दोघांमध्ये चर्चा चालते. (या सबंध नाटकात प्रत्यक्षाच्या चौकटीच्या आतबाहेर पात्रांची ये–जा चालू असते. उदा. येथे द साद आणि मारात हे स्थल-कालदृष्ट्या वेगवेगळ्या चौकटीतले आहेत ! )

मंचाच्या भोवती इस्पितळातील पन्नाससाठ वेड्यांचा गराडा पडलेला असतो. हे भूमिका वठविताहेत फ्रेंच राज्यक्रान्तीच्या वेळच्या गोरगरीब नागरिकांच्या ! नाटकात अधूनमधून हे वेडे आपल्या भूमिका विसरतात, नैसर्गिक अवस्थेत प्रकट होतात आणि पिसाळल्या-प्रमाणे थैमान घालतात. मग इस्पितळाचे रक्षक त्यांच्यावर दंडुके चालवितात व त्यांना थोडेफार आवरतात. मारातच्या खुनाची घटना नाटकाच्या अखेरीला आहे. नाटक संपते तेव्हा हे वेडे मोकाट सुटतात. सेंट झेवियर कॉलेजच्या सभागृहात काळोख होताक्षणीच वेड्यांचे काम करणारे नट आरडाओरडा करीत, थयथयाट करीत प्रेक्षकांनाच जणू वेढून टाकू पाहू लागले.

सबंध नाट्यप्रयोग पाहायला इस्पितळाचा प्रमुख कुल्मिए हासुद्धा सहकुटुंब हजर असतो. नाटक पाहायला मी गॅलरीत बसलो होतो तेथे माझ्या उजव्या हातालाच ही मंडळी स्थानापन्न झालेली होती. नाटकातील पात्रे जेव्हा शिस्तभंग करीत किंवा मुळात नसलेले संवाद बोलत (आणि अशा रीतीने प्रचलित राज्ययंत्रणेचाच निषेध करीत) त्या वेळी त्या यंत्रणेचा एक सुप्रतिष्ठित प्रतिनिधी म्हणून कुल्मिए मधूनच उठून द सादला बजावत असे : "आपण पास केलेल्या नाटकात हे नव्हते ! हे चालायचे नाही ! हे बरे नव्हे ! "

वाइसच्या नाटकाचे संवाद दोन दोन पंक्तींच्या सयमक कड-व्यांच्या स्वरूपात लिहिले गेलेले आहे. कथानकाच्या अनुरोधाने चार वेड्यांचा एक गायकवृन्द मधूनमधून भाष्य करीत असतो. त्यांनी गायिलेले संवाद नीट न समजल्यामुळे बराचसा विरस होई. नाटकातील प्रत्येक प्रसंग वर म्हटल्याप्रमाणे मुद्दाम 'स्टेज' केल्या-सारखा सादर केला जाई; त्यामुळे पात्रांच्या हालचाली पाश्चात्य नृत्यातल्या संथ लयीतल्या पवित्र्यांचा कित्ता गिरवीत. नाटकात एक संयोजकाचे (हेरल्ड) पात्र होते, आणि ते प्रत्येक प्रसंगाची एक शीर्षकवजा घोषणा करी. उदा. 'मारातच्या घरी कॉर्डेची पहिली भेट', 'कॉर्डेची दुसरी भेट', 'कॉर्डेची तिसरी व अखेरची भेट.' कॉर्डेची भूमिका करणाऱ्या बाईला झोपाळूपणाचा रोग होता अशी कल्पना केलेली आहे; त्यामुळेच की काय, मंचाखालच्या आपल्या कोपऱ्यातल्या जागेतून मंचावर मारातच्या स्नानपेटिकेकडे जाताना ती झोपेत चालत असल्यासारखी जाई ! या कॉर्डेचा एक प्रियकरही नाटकात असतो; आपल्या उतू जाणाऱ्या कामवासनांचे ओंगळवाणे प्रदर्शन करीतच तो तिचे प्रियाराधन करीत असतो. मारातच्या पूर्वनियोजित खुनापासून तिला प्रवृत्त करण्याचा प्रयत्न हाच प्रियकर मोठ्या केविलवाण्या स्वरात करीत असतो.

नाटकात खरा रंग भरतो तो मध्यंतरानंतर. पहिल्या भागात रूढ नाट्याविष्कारापासून वेगळे असे जे एकेक प्रकार चाललेले असतात त्यामुळे प्रेक्षक स्तिमित मात्र होत असतो. सयमक संवादां-मध्ये एक प्रकारचा कृत्रिमपणा, थंडपणाही जाणवत असतो. दुसऱ्या भागात कॉर्डे मारातच्या स्नानपेटिकेकडे जाऊन खंजीर खुपसून त्याचा खून करते. मारात कोसळून मंचाकडून जमिनीकडे जाणाऱ्या कलत्या लाकडी फळीवर पडतो.

द सादची 'सॅडिझम'ची तत्त्वप्रणाली ज्यांना परिचित आहे त्यांना या नाटकातील एका प्रवेशाची विशेष गंमत वाटेल. या प्रवेशात द साद आपल्या उघड्या पाठीवर कॉर्डेकडून चाबकाचे फटके मारून घेतो ! थिएटर ग्रूपच्या प्रयोगात या प्रकाराची केवळ ओझरती सूचना देण्यात येऊन उरलेल्या प्रवेशाला कात्री लावण्यात आलेली होती !

अनेक वेडे ज्यात सतत धुमाकूळ घालीत असतात अशा या नाट्यप्रयोगाचे दिग्दर्शन करणे फार कठीण. रूढ अभिनयाबरोबरच त्यात संगीत, नृत्य, मूकाभिनय आणि मोठ्या समूहाच्या अनिर्बंध हालचाली यांचाही समावेश होता. या परिचित नाट्यतत्त्वांचे एक नवेच रसायन 'मारात-साद'मध्ये प्रत्ययाला येते. अलीक पदम-सीनी आपली कामगिरी फारच कसोशीने पार पाडली होती असे म्हटले पाहिजे. फक्त कॉर्डेची भूमिका करणारी नटी विशेष समाधान-कारक वाटली नाही.

हे नाटक पाहून झाल्यावर काही दिवसांनी सहज एक चित्रांचे पुस्तक चाळीत असताना डेव्हिड या सुप्रसिद्ध चित्रकाराच्या 'मारा-तचा मृत्यू' या चित्राची प्रतिकृती मी पाहिली. फ्रेंच जनतेला उद्दे-शून करावयाची आवाहने खरडीत असताना आपल्या स्नानपेटिकेत मरून पडलेल्या मारातचे हे चित्र अत्यंत हृदयस्पर्शी आहे. या भीषण शोकात्मिकेमागील अवघी करुण भावना डेव्हिडने मारातच्या चेहऱ्यावरच ओतलेली आहे. इतिहासातील ही घटना 'मारात-साद'-मध्ये साकार करतात ते शॅरेन्टनच्या इस्पितळात खितपत पडलेले वेडे ! जणू शोकात्म अनुभूतीचे दोन मोठे प्रवाहच या नाटकाच्या रूपाने एकत्र येत असतात, आणि मानवी दुःखाचा त्यामुळे एक तीव्रतर प्रत्यय जसा आपल्या मनाला येतो तशी एक कडवट चवही तोंडात रेंगाळत राहते.

## फ्रेंच, जर्मन प्रदर्शने

जानेवारी महिन्यात जहांगीर आर्ट गॅलरीमध्ये जवळजवळ एकाच वेळेला अभिजात पाश्चात्य कलेची दोन प्रदर्शने पाहायला मिळाली : एक फ्रेंच टॅपेस्ट्रीचे आणि दुसरे केथ कॉलविझ या जर्मन चित्रकर्तीच्या चित्रांचे.

'टॅपेस्ट्री'ला मराठी प्रतिशब्द काय द्यायचा ते लक्षात येत नाही. ढोबळ अर्थाने 'गालिचे' असे म्हणता येईल. पण जमिनीवर अंथरायचे गालिचे नव्हेत तर भिंतीवर टांगायचे गालिचे ! चित्रकार तपशील-वार रंगचित्र रंगवून देतो, आणि मग त्यातील छटान् छटा मुळाबर-हुकूम सांभाळून टॅपेस्ट्री विणली जाते.

अशी एक जगद्विख्यात टॅपेस्ट्री मी प्रथम पाहिली ती कॉव्हेन्ट्री कथीड्रलमध्ये. गेल्या महायुद्धात कॉव्हेन्ट्री शहर जर्मन बॉम्बहल्ल्या-







वाली बेचिराख झालेले होते. शहरातील प्राचीन कथीड्रल उध्वस्त झालेले होते. युद्ध समाप्तीनंतर ते सर बेसिल स्पेन्स या वास्तुशास्त्रज्ञाच्या आराखड्यानुसार अद्ययावत् शैलीत पुन्हा उभारण्यात आले. त्यात 'गाभाऱ्या'च्या पिछाडीला ग्रॅहम सदरलॅन्ड यानी रंगविलेली मोठी टॅपेस्ट्री लावण्यात आलेली आहे, आणि तिच्यावर ख्रिस्तजीवनातील प्रसंग व प्रतीके विणलेली आहेत.

हे विषयान्तर येथे करण्याचे कारण एवढेच की कॉव्हेन्ट्रीमधील ही सुप्रसिद्ध टॅपेस्ट्री विणण्याचे काम सोपविण्यात आले होते ते फ्रेंच कारागिरांकडे. फ्रान्समधल्या तीनचार गावी अशा टॅपेस्ट्री विणण्याची केंद्रे आहेत, आणि तेथे काही शतकांपासून या असाध्य कलेची परंपरा चालत आलेली आहे. जहांगीर आर्ट गॅलरीमध्ये काही जगद्विख्यात चित्रकारांच्या टॅपेस्ट्रीचे अस्सल नमुने लावलेले होते. टॅपेस्ट्री विणणारे कारागीर फ्रेंच, परंतु चित्रकार मात्र सारेच फ्रेंच नव्हे. काही जन्माने फ्रेंच, तर काही फ्रान्समध्ये स्थायिक झालेले, तर काही युरोपातल्या इतर देशातले. अर्थात् गेली कित्येक वर्षे फ्रान्स हेच मुळी युरोपीय चित्रकलेचे माहेरघर समजले जाते, तेव्हा अशा भेदभावाचा खटाटोप करण्याचे कारण नाही.

ल कॉर्बुजिए, हान्स आर्प, जोन मिरो हे यापैकी काही नावाजलेले कलावन्त. ल कॉर्बुजिएची ख्याती मुख्यतः वास्तुशास्त्रज्ञ म्हणून होती; परंतु 'ॲबस्ट्रॅक्ट' अगर प्रतीकात्मक चित्रकलेतही त्याची गती होती. आर्प हा स्विस चित्रकार रचनाकार (डिझायनर) म्हणूनही गाजलेला होता. मिरोची चित्रे एखाद्या बालकाच्या प्रतिभेतून जन्माला आल्यासारखी असतात : त्यातील आकृती आणि रंग या दोहोंच्या दृष्टीने !

या टॅपेस्ट्रींचा विशेष हा की एके काळी वास्तववादी चित्रे विणण्यात मग्न असलेले कारागीर आजकालची 'ॲबस्ट्रॅक्ट' चित्रे तितक्याच कुशलतेने—किंबहुना जवळिकीच्या भावनेने—विणू शकतात हे त्या पाहताना प्रथमदर्शनीच लक्षात येत होते. प्रदर्शनातील जवळजवळ सर्वच चित्रे 'ॲबस्ट्रॅक्ट' होती, पण ती एकसुरी वाटत नव्हती. रंगांचे आणि मुक्त आकारांचे विविधतापूर्ण उन्मेष तेथे दिसत होते.

या टॅपेस्ट्रींच्या सोबतीला आधुनिक 'स्टेन्ड ग्लास' चित्रकलेचेही काही नमुने होते. परंतु आकारातील फरकामुळे ते मनात तितके ठसले नाहीत. रुओल्ट या सुप्रसिद्ध फ्रेंच चित्रकाराच्या मुलीने तयार केलेले एक चित्र यात होते. यातील कुतुहलाची गोष्ट एवढीच की खुद्द रुओल्टच्या शैलीचे 'स्टेन्ड ग्लास' कलेशी फार मोठे साम्य होते. 'स्टेन्ड ग्लास' चित्रांचा उपयोग पाश्चात्य देवालयांमधून मोठ्या प्रमाणावर केला जातो. रुओल्टची या धर्तीची तैलचित्रेही प्रखर धर्मभावनेने प्रेरित झालेली असत.

१८६७ साली केथ कॉलविझचा जन्म झाला; २२ एप्रिल १९४५ रोजी ती मरण पावली. दोन महायुद्धांचा संहार तिने डोळ्यांनी पाहिला. पहिल्या महायुद्धात तिचा धाकटा मुलगा रणांगणावर कामी आला. १९१६ साली तिने आपल्या एका चित्राविषयी आपल्या दैनंदिनीत नोंद केलेली आहे :

"चित्रातल्या आईने आपल्या मरण पावलेल्या मुलाला कवटाळून धरलेले आहे. अशी आणखी शेकडो चित्रे मी काढू शकेन परंतु माझ्या दिवंगत मुलाजवळ काही मी पोचू शकत नाही. जणू



**जोन मिरोची एक टॅपेस्ट्री**

या चित्रांतच त्याचा शोध लागेल अशा समजुतीने मी त्याला अजून शोधीत आहे."

जहांगीर आर्ट गॅलरीमधील प्रदर्शनात अशा प्रकारची काही हृदयस्पर्शी चित्रे होती. परंतु केथ कॉलविझला जन्मभर भारून टाकणारा विषय एकच—तो म्हणजे जुलमाचा प्रतिकार करणारा बंडखोर मानव. तिच्या ऐन तारुण्यात आर्थिक परिस्थितीमुळे गांजून गेलेल्या समाजाचे वास्तववादी चित्रण एमिल झोलासारख्या कादंबरीकाराने केलेले होते. त्या वास्तववादाचा प्रभाव तिच्या चित्रणशैलीवर पडलेला होता. दुःखाने पिळवटून गेलेले माणसांचे—विशेषतः स्त्रियांचे—चेहरे तिच्या रेखाचित्रात जितके प्रत्ययकारी वाटतात तितके इतर चित्रकारांच्या कृतींमध्ये वाटत नाही. जणू युगायुगांच्या छळाच्या, हालाच्या, वेदनेच्या खुणा या चेहऱ्यांवरील रेषांमध्ये उमटलेल्या आहेत.

जर्मनीतील विणकरांचे बंड, तेथील शेतकऱ्यांचा उठाव या पहिल्या महायुद्धापूर्वीच्या घटना तिने विशिष्ट चित्रमालिकांमधून रेखाटल्या. एकेका व्यक्तीच्या जीवनावर आलेले मळभ जसे तिच्या चित्रांमधून तीव्रतेने व्यक्त होते तसेच मोठ्या समूहाचे लाटेसारखे उफाळून येणारे निग्रही संचलनही ती समर्थपणे रेषाबद्ध करी. पहिले महायुद्ध आणि दुसरे महायुद्ध यात जर्मनीच्या दृष्टीने सूक्ष्म फरक होता. निष्पाप तरुण पिढी एखाद्या निरर्थक हत्याकांडात बळी पडावी ही भावना पहिल्या महायुद्धात सार्थ ठरली. केथ कॉलविझच्या चित्रात हीच व्यक्त झालेली आहे.

रेखाचित्रकार म्हणून केथ कॉलविझचे कौशल्य अजोड आहे. दहाएक वर्षापूर्वी तिच्या चित्रांचे प्रदर्शन प्रथम जहांगीर आर्ट गॅलरीत भरले होते, तेव्हाच ही अक्षरशैली मनात ठसली. ते प्रदर्शन पूर्व जर्मन सरकारने भरविले होते, तर परवाचे प्रदर्शन पश्चिम जर्मनीच्या मॅक्स मुल्लर भवनाच्या मुंबई शाखेने भरविलेले होते. पहिल्या प्रदर्शनात केथ कॉलविझचे 'सेल्फ-पोर्ट्रेट्स्' बरेच होते, परवाच्या प्रदर्शनात तिच्या हातची दोन चार शिल्पे होती—त्यात तिने स्वतःचा म्हातारपणी केलेला एक अर्धपुतळा होता.

आपल्या आत्मचित्रात केथ कॉलविझ हुबेहूब आपल्या इतर चित्रातल्या एखाद्या पीडित कामगार स्त्रीप्रमाणे दिसते ! चित्रकार चित्रविषयाशी तादात्म्य पावल्याचे हे एक आगळे उदाहरण आहे. केथचा नवरा बर्लिनच्या झोपडपट्टीमध्ये आपला व्यवसाय चालविणारा एक डॉक्टर होता ही वस्तुस्थितीसुद्धा या संदर्भात उल्लेखनीय ठरते. ●●●









अनुक्रमणिका



## महाराष्ट्र राज्य नाट्यस्पर्धा–

प्रतिवर्षीप्रमाणे यंदाही राज्य नाट्यस्पर्धा निरनिराळ्या केंद्रांवर पार पडल्या व त्यातून दोन नाटके निवडण्यात आली. अंतिम स्पर्धांना नेहमीच एक औत्सुक्य व कुतूहल लाभते. आणि ते योग्यही असते. विविध गावाहून 'द बेस्ट' असं निवडून येत असतं आणि ते पाहून, पारखून घेण्याची, त्यातून काही शिकण्याची मुंबईकरांची तयारी असते. यंदाही ५ जानेवारी ते २४ जानेवारी ह्या काळात (रविवार वगळून) ह्या अंतिम स्पर्धा झाल्या. त्या स्पर्धांसाठी एकूण अठरा नाटके सादर करण्यात आली होती. दरवर्षी ह्या स्पर्धांच्या निमित्ताने काही नवीन नाटके पहायला मिळतात. यंदाच्या अठरा 'नाटकात जुने जाऊ द्या मरणा लागुनी' (रंगायन,भोपाळ) 'काळे बेट, लाल बत्ती' (अहमदनगर कॉलेज) 'भंगले ते स्वप्न का ?' (विकास मंडळ, वसई) 'स्वप्न राहिले लोचनी' (महाराष्ट्र मंडळ, भांडूप) 'जाळ्यात अडकला कोळी' (स्टेट बँक स्टाफ कल्चरल कमिटी) 'का? असच कां ?' (उदय कला केंद्र–मुंबई) 'कुचलिया वृक्षाची फळे' (आर्टिस्ट कंबाइन, ग्वाल्हेर) 'नाव नाही नाटकाला' (बेंगॉली असोसिएशन, नागपूर) 'डाऊन ट्रेन' (बरोडा ॲमॅच्युअर्स ड्रॅमॅटिक क्लब, बरोडा) 'लोभ नसावा, ही विनंति' (रंगायन,मुंबई) 'अडीच घरं वजीराला' (महाराष्ट्रीय कलोपासक, पुणे) 'धन अपुरे' (वरेरकर नाट्य संघ-बेळगाव) ही नवी नाटके सादर करण्यात आली तर दोन नाटके नवी नावे धारण करून प्रेक्षकांपुढे पुन्हा आली. 'मीही आहे एक जटायू' व 'हे स्वप्न मानवाचे' ही ती दोन नाटके ! अर्थातच नवीन नावे फारसा 'नवा' परिणाम साधू शकली नाहीत हा भाग अलाहिदा ! नव्या नाटकात 'बंगाली' ढंगाची व बंगाली कलाकार, नेपथ्यकारांनी सादर केलेली नाटके होती. नाटकात दम नसला की नेपथ्य नाटकाला फारसे तारू शकत नाही ह्याचा प्रत्यय आला. नेपथ्य–प्रकाश योजनेपुरते पारितोषिक मात्र मिळते. योग्यच झाले. बंगाली रंगमंच तंत्रदृष्ट्या फारच प्रगत असा आहे. त्या तंत्राला जर प्रभावी नाट्य गवसले तर ते मराठी रंगमंचावर चमत्कार करून जाईल ह्याचा विश्वास मात्र सदर स्पर्धात मिळाला. प्रा. वसंत कानेटकर हे आता कीर्तिवंत नाटककार झाले आहेत. अपेक्षा वाढल्या त्याना त्यांनी योग्य दाद दिली, देतील हा विश्वास–म्हणूनच त्यानी "नवी बाटली जुनी दारू" असला प्रकार केला नसता तर बरे झाले असते असे वाटते. एक तर ते करूनही भवितव्य (त्या नाटकाचे व स्पर्धेतल्या प्रयोगाचेही) फारसे बदलले नाही. दप्तरी नोंद मात्र राहिली–प्रा. कानेटकरांनीही हे केले ! ! "मीही एक जटायू"बद्दलही हेच म्हणता येईल. दोन्ही प्रयोग बरे झाले इतकेच ! रणजित देसाई हे असेच एक मोठे नाव–कथा-कादंबरी क्षेत्रात देसायांनी अनेक चमत्कार स्वतःच्या नावे नोंदलेले आहेत. त्यामुळेच अपेक्षा उंचावतात. पण नाटककार देसाई हे अजूनही चांगला ठसा उमटवू शकलेले नाहीत असे मोठ्या खेदाने म्हणावे लागते. कांचनमृग, तानसेन आणि आता पाहिलेले 'धन अपुरे' ह्या तिन्ही नाटकांना दुर्दैवाने हेच उत्तर मिळते. रणजित देसायांमधला पुढारी, प्रचारक, तत्वज्ञ त्यांच्यातल्या नाटककारावर, कलाकारावर फार मात करतो असे दिसून येते. यंदाची व्याख्यानवाजी तर फार वाढली व त्यामुळे ती फारच हास्यास्पदही झाली. समाजाची अनिष्ट वळणे आता केवळ व्याख्यानबाजीने बदलणार नाहीत. 'बोले तैसा चाले" अशी दिव्यत्वाची प्रचीती जेथे येईल तिथेच ती ऐकली जाऊं शकेल असे ते नाटक पाहताना सतत जाणवत होते. देसायातला कलाकार मोठा आहे. पण तो त्यांनी जपला पाहिजे असे सुचवावेसे वाटते.

अठरा नाटकातल्या तीनच नाटकात तशी स्पर्धा होती. काळे बेट, लाल बत्ती; कां? असच कां? आणि लोभ, नसावा ही विनंती ही तीन नावे. प्रथमपासूनच मनात निर्णय आकार घेत होता. आणि यंदाच्या स्पर्धेचे वैशिष्ट्य म्हणजे परीक्षक, प्रेक्षक आणि नाट्यसमीक्षक यांचे यंदा प्रथमच मतैक्य झालेले दिसले. सहसा हे घडत नाही म्हणून उल्लेख केला. प्रा. मधुकर तोरडमल ह्या ह्या नाट्य स्पर्धातून मिळालेला आणखी एक समर्थ नाटककार व नट ! ! ह्या स्पर्धांबद्दल बरेचसे चांगले म्हणता येण्यासारखे आहे. त्यातला पहिला भाग ह्या नव्या नाटककारांबाबतचा ! ह्या स्पर्धा होतात म्हणून नव्यांना 'प्रयोग' करून पाहता येतो. तो यशस्वी झाला तर विश्वास वाढतो. ह्या स्पर्धातूनच मराठीला कानेटकर, तेंडुलकर, पारखी, देसाई, पावसकर, खरे, ह्याजसारखे व आजच्या तोरडमलांसारखे नाटककार दिसले आहेत. व्यावसायिक रंगमंचाला काही नाटके मिळाली आहेत. कलाकारही दिसले आहेत. आणि त्याहीपेक्षा एक फायदा म्हणजे गावोगावी नाट्यविषयक वातावरण निर्माण होते आहे. नाटके लिहिली जात आहेत. पहिल्या फेरीत कितीतरी नवीन नाटके येतात हे विदित आहेच. तंत्रविषयक कल्पकतेलाही स्वयंभू गती लाभते आहे. कल्पकतेला नवे नवे खाद्य मिळते आहे–मला हे फायदे महत्त्वाचे वाटतात. ह्या स्पर्धांच्या अनुषंगाने आणखी दोन गोष्टी लिहितोः एक म्हणजे समर्थ अशा संगीत नाटकाचे प्रयोग ह्या स्पर्धेत अजून पहायला मिळालेला नाही. 'नयन तुझे'मध्ये गोपाळ कौशिकांसारखा गायक इंदूरहून जाणण्याइतपतच तानवाजी करून गेला. यंदा तसे काहीच घडले नाही. संगीताला स्वतंत्र बक्षीस आहे म्हणूनही कुणी तसा प्रयत्न करायला हरकत नव्हती. परंतु ही उणीव जाणवतेच. दुसरी गोष्ट म्हणजे ह्या स्पर्धांना प्रेक्षक उपेक्षेनेच मारताना दिसतात, असे कां ? तिसरे जाणवते ते असे की, मुंबईचे प्रेक्षक क्वचित प्रसंगी असहिष्णु व असहनशीलतेनेही वागतात इंदूर, ग्वाल्हेर, बडोदे, नागपूर, हैदराबाद, बेळगाव, औरंगाबाद, भोपाळ आदि बृहन्महाराष्ट्रातील सांस्कृतिक व कलात्मक वारसा चालविणाऱ्या ह्या संस्थांचे भाईबंद मुंबईला वर्षातून एकदाच भेट

देशांत (प्राथमिक फेरी जिंकल्यास) ह्या प्रत्येक ठिकाणचा मराठी ढंग वेगळा असला तरी अखेर तो 'कवतुके' बोललेला 'मऱ्हाठाचि बोल' असतो ही गोष्ट मुंबईकर प्रेक्षक क्वचित प्रसंगी विसरतात व नाटक पाडण्याचा प्रयत्न होतो. बरे वाटले नाही तर उठून जाण्याचे स्वातंत्र्य साऱ्यांना असतेच की! पण 'मऱ्हाठी'चा झेंडा महाराष्ट्राबाहेर फडकत ठेवणाऱ्या ह्या कलाकार मित्रांना अन्याय होईल वा अपमानास्पद वाटेल असे आपण खरं तर काही करू नये असे मला वाटते. प्रतिवर्षी हे घडते म्हणून यंदा त्यासंबंधी मुद्दाम हा उल्लेख केला.

प्रा. मधुकर तोरडमल यांनी सादर केलेल्या 'काळे बेट, लाल बत्ती'ला स्पर्धेत पहिले पारितोषिक मिळाले. त्यांना दिग्दर्शनाचे, अभिनयाचेही पहिले पारितोषिक मिळाले. अहमदनगर कॉलेजचा हा वस्तुतः इंग्रजीचा प्राध्यापक. पण नाटकाचे वेड विद्यार्थिदशेपासूनच. दोन वर्षांपूर्वी नगर कॉलेजच्या संमेलनाला जाण्याचा योग आला. पाहुणे होते वामनराव चोरघडे. त्यावेळी ह्या तरुण, उमद्या व्यक्तित्वाच्या, नाटकवेडया कलाकाराचा प्रत्यक्ष परिचय झाला. 'समानशील' माणसे भेटली की बरे वाटते पण परिचय तितपतच राहिला. मग तोरडमल भेटले ते नाटकातच गत वर्षी 'सैनिक नावाचा माणूस'मध्ये व यंदा ह्या पहिल्या क्रमांकाच्या नाटकात. गतवर्षीच्या 'सैनिकनावाचा माणूस' ह्या नाटकातच तोरडमल यांनी आपल्या नाट्यलेखनातील व अभिनयातील आगळेपणाची प्रभावी चुणुक दाखविली होती (इतकी की त्यांना पहिले बक्षीस मिळाले नाही हे कळताच बरेचसे लोक हळहळले.) विषयाबाबत सर्वस्वी आगळे व काही तरी समर्थ नाट्य ह्या माणसाला भावत असले पाहिजे ह्याची प्रचीती गतवर्षीप्रमाणे यंदाही आली. 'सैनिक'प्रमाणेच 'काळे बेट'ची कथावस्तू अशीच वेगळी आहे. समर्थ आहे. नाट्यपूर्ण आहे. काहीशी थरारकही आहे. प्रत्येक माणसात असतो देव, दानव आणि मानव ! ह्या नाटकातल्या नायकात असाच एक हिंस्त्र पशू सुप्तपणे दडलेला आहे. त्या काळ्या बेटाचा मालक माणसाची शिकार शोधणारा पशू आहे. वादळात बोट फुटते आणि काही माणसे ह्या बेटाच्या किनाऱ्याला लागतात. आणि निरनिराळ्या प्रकारे ह्या हिंस्त्र मानवाच्या शिकारीला बळी पडतात. भिन्न स्वभावाची ही माणसे बेटावर एकत्र आल्यानंतर हा बेटमालक त्यांच्यातच माणसाच्या रक्ताची चटक उत्पन्न करतो आणि परिणामतः ही माणसे एकमेकांना मारतात. मालक हे दृश्य पशूवृत्तीने पाहतो. विकट हास्य करतो. शेवटी त्यातला कम्युनिस्ट त्याला मारतो. तेव्हा मरताना मालक म्हणतो की आपल्या बेटावरच्या उत्खननात बुद्धशिष्य अशोकचे शिलालेख सापडले आहेत. हे शिलालेख ह्या हिंस्त्र मानव संहाराचे साक्षी आहेत. ह्या नाट्यलेखनात काही दोष आहेत. पण नाटक अखरपर्यंत प्रेक्षकांना खिळवून ठेवते. दिग्दर्शन, अभिनयाचे हे यश मानावे लागेल. बेट मालकाची भूमिका ते अक्षरशः जगतात. ते अभिनय करीतच नाहीत. त्यामुळे त्याचा ठसा मनावर ठामपणे उमटतो. बाकीची पात्रे कामे करतात. पण ठसा तोरडमल यांचाच ! नाटकाचे नेपथ्य सूचक नसले तरी प्रभावी, अस्वस्थ करुन सोडणारे, वातावरणानुकूल असेच होते. लेखन, दिग्दर्शन व प्रमुख भूमिकात सुयश मिळविल्याबद्दल तोरडमल याचे मी अभिनंदन करतो. हे नाटक मुं. म. साहित्य संघाने घेतले असून त्यात दिग्दर्शन, भूमिका तोरडमलच करणार असल्याचे ऐकतो. नगरचा हा 'बांड' मुंबईच्या बाजाराला पटला ही गोष्ट नगरच्या गुणाची व मुंबईच्या रसिकतेची जणु ग्वाही ठरावी.

'रंगायन'चेही मी अभिनंदन करतो. 'लोभ नसावा, ही विनंती' ह्या नाटकाला दुसरे पारितोषिक मिळाले म्हणून ! रंगायनचे नाटक प्रकृतीने आगळे व करायला तसे अवघडच होते असे म्हणता येईल. दुसऱ्या महायुद्धाच्या पार्श्वभूमीवरील एका आर्मी हॉस्पिटलमधली ही कथावस्तू ! विभिन्न देशातली व आगळे स्वभावविशेष असलेली ही सारी 'माणसे' रुसतात, रागावतात पण प्रेमही करतात. तेवढ्यात तेथे एक पेशंट येतो. तो काही दिवसानी मरणार म्हणून त्याला नीट जपा. त्याच्या मनाला धक्का बसेल असे वागू नका म्हणून अधिकारी बजावतो. त्यासाठी चाललेल्या धडपडीतून नाट्य फुलते. विविध स्तरावर ते हलवून सोडते. अस्वस्थ करते. अखेर मायाशून्य जीवनातून एकलकोंडा व चिडखोर झालेला लॅची (स्कॉट) माणसात येतो. नाटक संपते. ह्या नाटकाचा पिंड मुख्यतः मानसशास्त्रीय आहे. भेटतात माणसे. दिसतात त्यांची विभिन्न व्यक्तित्वे. पाझरते माया–माणसातला निर्व्याज स्नेह मनाला चटका लावून जातो. अंतर्मुख करतो. नाटकाचे दिग्दर्शन अरविंद देशपांडे यांचे आहे. तिन्ही अंकभर माणसे खबरदार असतात. ते हॉस्पिटल तट्टयाचेच–तंबूचेच ! पण सजीव होऊन जाते. खाकी मच्छरदाण्या म्हणून सैनिकी हॉस्पिटल. एरव्ही सर्व माणसाचाच खुल्लमखुल्ला व्यवहार. नारायण पै यांचा यांक, यशवंत भागवतांचा टॉमी, वृंदावन दंडवते यांचा ब्लॉसम, अनुपा पालेकर यांची सिस्टर मार्गारेट आणि अरविंद कारखानीस यांचा लॉची ह्या संस्मरणीय भूमिका ! विजय तेंडुलकर यांचे ह्या अनुवादित नाटकातील संवाद मला अधिक सहज सुंदर, सूचक व सरळ असे वाटले. त्यांचेही अभिनंदन करतो. ह्या स्पर्धेच्या निमित्ताने रंगमंचावर आलेल्या पण बक्षीसपात्र न ठरलेल्या श्याम फडकेलिखित व उदय कला केंद्रनिर्मित 'कां ? असंच कां ?' ह्या नाटकाचाही एक चांगले नाटक व चांगला प्रयोग म्हणून उल्लेख करतो. ह्या संचाची ताकद मोठी आहे. 'निखारे'नेंही हे सिद्ध केले होतेच. यंदाचाही प्रयोग चांगलाच झाला. बक्षीस मिळाले नाही म्हणून विरस होणे स्वाभाविक असले तरी नाटकाचे (कलेचे) आव्हान व आवाहन नेहमी प्रधान मानावे असेच मी तरी सुचवीन. स्पर्धा हे निमित्त. कलात्मक आवाहन महत्त्वाचे. प्रयोग, प्रयत्नातूनच पारितोषिकही चालत येईल. हिंमत न सोडता असे प्रयत्न होतच राहिले पाहिजेत. पुणेकर मंडळींनी केलेली निराशा हीही काहीशी अस्वस्थ करून जाते.

समाज कल्याण खात्याचे मंत्री श्री. बारस्कर व कार्यवाह श्री. राजाराम हुमणे यांचे व त्यांच्या सर्व सहकाऱ्यांचे मी ह्या 'खटाटोपा'बद्दल अभिनंदन करतो.

— चित्रगुप्त











अनुक्रमणिका



## मुंबईच्या प्रक्षोभाच्या निमित्ताने

मुंबई पेटली. खूप पेटली. सत्तावन्न माणसे देवाघरी गेली. कोटयावधींचे नुकसान झाले. हजारो माणसे बंदिस्त झाली. गाडया चालू झाल्या. मुंबईचे जीवनही आता पुन्हा सुस्थिर होईल. पण मुंबईची शान गेली. ती परत यायला दहा वर्षे तरी लागतील असा सरकारी अंदाज आहे. घडले हे अत्यंत अनिष्ट घडले. जे मेले त्यांना स्वराज्यात जगण्याचा 'नैतिक' अधिकार असूनही ते मेले. त्यांच्या भावना तीव्र झाल्या. त्यातून हिंसक उद्रेक झाला असेल. पण त्या वार्तांच्या तपशीलात मी शिरत नाही. हे असे कां घडते? आणि असेच कां घडत आले आहे? दिल्लीकरांनी ह्या गोष्टीचा मूलभूत विचार करण्याची गरज आहे असे आता वाटू लागले आहे. माणसे महत्त्वाची नाहीत. प्रवृत्ती व प्रकृति महत्त्वाची आहे. नेहरू गेले, शास्त्री गेले, इंदिराजी आल्या. पंत गेले, शास्त्री गेले, चव्हाण आले तरीही 'बेळगाव-कारवार-निपाणी-मालकी'चा प्रश्न सर्व 'लोकशाही-निष्ठ' उत्तरे तेथल्या मराठी माणसांनी चोखपणे 'महाराष्ट्रानुकूल' दिलेली असताना मुद्दाम रेंगाळत ठेवण्यात आला आहे तो दिल्लीकरांच्या थंड व काळकाढू धोरणामुळे. घोळाचा खेळ दिल्लीकर खेळत आले आहेत. खेळत आहेत आणि जीव मात्र सीमाभागातील जनतेचा (व आता मुंबईकरांचाही) जातो आहे आणि ह्याबद्दलच्या सर्व लोकशाही मार्गांची तड लावूनही हा प्रश्न सुटत नाहीसे दिसले तेव्हा जनतेच्या भावना प्रक्षुब्ध झाल्या व 'मोरारजीं'चे निमित्त पुरले. घडले ते निःसंशय वाईट. पण कां घडले ह्याचा दिल्लीकरांनी सत्वर विचार करणे अगत्याचे आहे असे मला वाटते. दडपशाहीने भारतीय जनतेची स्वातंत्र्याकांक्षा मेली नाही हे ज्यांना ठाऊक आहे त्यांनी तरी सत्वर निर्णय घेण्याची गरज आहे. गोळ्या घालून प्रश्न सोडविता येत नाहीत. पण प्रत्येकवेळी हिंसक प्रक्षोभानंतरच प्रश्नांना गती मिळते असा गेल्या वीस वर्षातला दुदैवी अनुभव आहे. लोकमानसात ह्या भावनेला घर करून दिले गेले आहे. म्हणूनच कृषिविद्यापीठासाठीही त्याच मार्गाचा लोक अवलंब करतात. शासनाला घोळ घालायची जी 'क्रॉनिक' सवय जडली आहे त्यातूनच ह्या साऱ्या आपत्तींचा जन्म झाला आहे. म्हणून शिवसेना, तिचे नेते, गुंडपुंड, तरुण विद्यार्थी वा स्त्रिया यांनी दोष देत फिरण्यापेक्षा प्रश्नाचे गांभिर्य ओळखून नाकारलेला न्याय बेळगाव-कारवारकरींना लवकर दिला गेला पाहिजे. सेनापति बापटांना इंदिराजींनी (व्यक्तिशः नव्हे. पंतप्रधान म्हणन) वचन दिले होते. आज त्यांना देवाघरी जाऊनही वर्ष होईल. न्याय मिळालेला नाही. ह्या विषयात केंद्रीय नेते अत्यंत मख्खपणे, हृदयशून्यतेने वागले आहेत. मुंबईच्या उद्रेकाला त्यांची ही हृदयशून्यताही अंशात्मक कारणीभूत आहे हे नम्रपणे म्हटलेच पाहिजे—संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन जसे वेळीच न्याय देऊन शमवले तसेच हेही आंदोलन सामंजस्याने शमवावे असेच कुणीही अपेक्षील. मुंबईच्या वस्तुपाठाने दिल्लीला हृदय (आणि ताठ कणा) लाभला व बेळगाव-कारवारच्या लोकशाहीनिष्ठ मराठी माणसांना न्याय मिळाला तर ही अनिष्ट प्रवृत्ती कायमची गाडली जाईल. आज तरी दुर्दैवाने ती जवळजवळ 'वैश्विक' रूप धारण करून आहे. ती अनिष्ट आहे. निंद्य आहे. निषेधार्हही आहे. पण केंद्रशासन आपले दायित्व (अंशात्मक का होईना) नाकारू शकणार नाही. एकीकडे तिचा निषेध करताना दिल्लीकरांनी आत्मपरीक्षण करावे. जीव घेणारा 'घोळ' नामक 'खेळ' खेळू नये ही विनंती करतो.

—सारस्वत



### नागपूर येथील लिंबू-प्रदर्शनात बेडेकर लोणच्यास पहिले बक्षीस

नागपूर येथे मध्यवर्ती सरकारतर्फे भरलेल्या लिंबू-प्रदर्शनात मे. व्ही. पी. बेडेकर अँड कं. प्रा. लि., चे 'लिंबू लोणचे व रसलिंबू' पहिल्या दर्जाचे ठरले असून आजपर्यंत अशाच स्वरूपाची पहिल्या दर्जाची बक्षिसे त्यांना अनेकवेळा मिळाली आहेत.

MH-450 Licence No. 170 to post without pre-payment MARCH










